# गुजराती भाषाप्रवेश

मराठी माध्यमाच्या द्वारा

मार्गदर्शक लेखक : भाऊ धर्माधिकारी

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

१९६९

# गुजराती भाषाप्रवेश

मराठी माध्यमाच्या द्वारा

मार्गदर्शक लेखक : **भाऊ धर्माधिकारी**

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

१९६९

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने मराठी भाषेच्या व साहित्याच्या विकासाचा जो विस्तृत, विविध आणि सर्वांगीण कार्यक्रम आखला आहे व जो मंडळ कार्यवाहीत आणत आहे त्यातील 'आंतरभारती योजना' हा एक महत्त्वाचा घटक आहे. आंतरभारती योजनेचे तीन भाग पडतात. ते म्हणजे एक, भारतातील साहित्यिक प्रचलित जिवंत भाषांचा द्विभाषिक कोश; दुसरा 'भाषा-प्रवेश' व तिसरा, 'साहित्य-परिचय'. या पुस्तकत्रयीच्या द्वारे मराठी प्रौढ विद्यार्थ्यांस भारतातील मराठीतर जिवंत साहित्यिक भाषांचे अध्ययन करता यावे असा मंडळाचा उद्देश आहे. द्विभाषिक कोशाचे स्वरूप द्विविध आहे. मराठी व अन्य भाषा हा एक प्रकार व अन्य भाषा व मराठी असा दुसरा प्रकार. कानडी भाषेपुरती सदर ग्रंथ योजना पूर्ण झाली असून ती मुद्रणावस्थेत प्रविष्ट झाली आहे. 'उर्दू-मराठी कोश' व 'गुजराती-मराठी कोश' अगोदरच प्रसिद्ध झाले आहेत. 'बंगाली भाषा-प्रवेश' मुद्रणावस्थेत आहे. बंगाली साहित्य परिचय आणि तामिळ व मलयाळम या भाषांच्या भाषा-प्रवेशांच्या मुद्रणप्रती तयार झाल्या आहेत. बंगाली-मराठी कोश आणि तामिळ-मराठी कोश यांच्या रचनेचे काम लेखकांकडे सोपविण्यात आले असून ते काम प्रगतावस्थेत आहे.

प्रस्तुत गुजराती भाषा-प्रवेश श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी मंडळातर्फे तयार केला आहे. त्यांच्याकडेच मराठी-गुजराती कोशाचे रचनाकार्यही सोपविण्यात आले आहे. त्यांनी मोठ्या आस्थेने व परिश्रमपूर्वक हे काम केले याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

वाई
दिनांक १४ जानेवारी १९६१
मकर संक्रमण.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

# प्रस्तावना

महाराष्ट्राचा आणि गुजरातचा फार पुरातन काळापासूनचा निकटचा संबंध आहे, आणि तो असणे स्वाभाविकच नव्हे तर अपरिहार्य आहे. गुजरात आणि कर्नाटक हे महाराष्ट्राचे शेजारी आहेत. या राज्यांच्या हद्दी महाराष्ट्राला भिडलेल्या आहेत. आणि नाना निमित्तांनी परस्परांचे एकमेकांशी व्यवहार निगडित असे आहेत. महाराष्ट्रात स्थायी झालेल्या गुजरातीभाषिकांची संख्या सुमारे साडे दहा लाखांवर आहे. मुंबई शहर हे गुजरात्यांची सुद्धा मायभूमी असल्यासारखेच आहे आणि मराठी-भाषिकांच्या खालोखाल तेथें गुजराती भाषिकांचीच संख्या आहे.

गुजराती आणि मराठी या प्राकृतोद्भव भाषा असल्यामुळे त्यांच्यात पुष्कळ साम्य आहे. गुजरातीची शब्दसंख्या अदमासे ६०,००० मानली तर त्यांत शेकडा ३५ टक्के शब्द तत्सम (म्हणजे संस्कृत) आहेत; अरबी-फारसीचे तत्सम शब्द ४ टक्के, इंग्रजीचे $\frac{1}{2}$ टका, हिंदीचे $\frac{1}{4}$ टका व काही मराठी, पोर्तुगीज व तुर्की म्हणजे एकूण ४० टक्के शब्द होतात, आणि बाकीचे ६० टक्के शब्द देशज व तद्भव आहेत. हे देशज व तद्भव शब्द सोडले तर बाकीचे वर उल्लेखिलेले ४० टक्के शब्द मराठीतही असेच्या तसे असलेले आढळतील असे समजण्यास हरकत नसावी. म्हणजे गुजराती भाषेतील ४० टक्के (किमान ३८ टक्के शब्द) मराठीत आहेतच. राहिलेल्या ६०-६२ टक्के शब्दांची घडण त्या त्या प्रदेशातील शब्द-घडणीची मोडणी वा लकब जशी असेल तशी होत असते. संस्कृत-प्राकृतोद्भव शब्दांची घडण गुजरातीत ज्या रीतीने होते तशी मराठीत होत नसेल, पण म्हणून मराठीतल्या त्या शब्दाचा तोंडवळा गुजराती त्या अर्थाच्या शब्दाच्या तोंडवळ्याहून अगदीच विपरीत किंवा भिन्न असणार नाही. उदाहरणार्थ, मराठी 'वासरू' शब्द; त्याचे मूळ संस्कृत 'वत्स', प्राकृत વચ્છ–વાછ; लहानपणाचा निदर्शक प्रत्यय 'रू' लावून मराठीत 'वासरू' आणि गुजरातीत 'વાછરું'. असा मराठी-गुजराती तद्भव शब्दांचा तौलनिक अभ्यास केल्यानंतर दिसून येईल की तद्भव शब्दांतसुद्धा मराठीत व गुजरातीत पुष्कळ साम्य आहे. मराठीतला 'तोरा' हा शब्द घेतला तर त्याचे मूळ तुर्की 'तोरह' (म्हणजे दिमाख, मिजास) [कदाचित् अरबी 'तौर' (म्ह० चालचलणूक)] असे आहे. त्यातून गुजराती शब्द मराठीच्या अर्थाचा 'तोर' असा बनला. मराठी भाषेचा आणि गुजराती भाषेचा असे दोन कोश जवळ घेऊन जर असे निवेदन करू लागलो तर गुजराती-मराठीत तितकाच फरक आहे जितका गुजराती-महाराष्ट्री धोतर नेसण्याच्या पद्धतीत. जरा सोगा किंवा पदर उजवीकडचा डावीकडे, इतकेच!

सारांश हा की गुजराती भाषा ही मराठी भाषेच्या खूप जवळ आहे आणि ती शिकायला फार क्लेश किंवा वेळ लागणार नाही. गुजराती भाषेत इतिहास, काव्य,

कथा, शास्त्र, इ. वाङ्मयही पुष्कळ आहे. गांधीयुगानंतर तर गुजराती साहित्यात एक नवसंस्कारिता आलेली आहे. निरनिराळ्या साहित्यगुणांचा व कलांचा (एक नाट्य सोडून) झपाट्याने विकास होत आहे. गुजरातेत शिक्षण, पुरातत्त्व, वाणिज्य, अर्थ, वृत्तव्यवसाय इ. शास्त्रांत पारंगत अशी थोर थोर माणसे उपलब्ध आहेत आणि त्या शास्त्रांची वाङ्मयसाधनेही निर्माण होऊ लागली आहेत. या सर्व दृष्टींनी रसिक मराठी वाचकाला गुजराती साहित्यात मनमुराद अवगाहन करून त्याचा आनंद लुटता येण्यासारखा आहे. मराठीतील उत्कृष्ट वाङ्मयकृतींचे ज्याप्रमाणे गुजरातीत लगेच्या लगेच अनुवाद प्रसिद्ध होत आहेत, तितक्या तत्परतेने नसले तरी मधून मधून गुजराती कथा-कादंबऱ्यांचे व विशेषतः गांधी-ग्रंथांचे मराठीत अनुवाद झाले आहेत, होत आहेत. ते याहून अधिक प्रमाणात झाले तर मराठी वाचक वर्गाला 'बांगलावाणी'प्रमाणेच गुर्जरवाणीची सुद्धा गोडी लागेल.

या मोठ्या दालनांत प्रवेश करण्याला मदत म्हणून गुजराती भाषेची मराठी वाचकाला कामचलाऊ ओळख करून देणे अवश्य आहे. तसे प्रयत्न आतापर्यंत एक दोन झाले आहेत, पण ते तुजबी आहेत. या पुस्तकाने केलेला प्रयत्न गुजराती शिकणाऱ्या मराठी विद्यार्थ्याला अधिक खंबीरपणे स्वतःच्या पायावर उभा करणारा आहे, असा आम्हांला विश्वास वाटतो. मराठी वाचक स्वतःच्या पायांनी गुजरातीच्या भव्य दिवाणखान्यात प्रवेश करू शकेल असा या पुस्तकाचा नम्र प्रयत्न आहे. या पुस्तकाच्या आधाराने शिक्षित मराठी लोक गुजरातीचे ज्ञान व्यवहारापुरते बोलण्याच्या व लिहिण्याच्या दृष्टीने ग्रहण करण्याला समर्थ व्हावेत अशी अपेक्षा बाळगली आहे. अर्थात अनुभवांती ते सिद्ध होणार.

'निवारा',
६०/१३ भारती निवास वसाहत
एरंडवन, पुणे ४

—भाऊ धर्माधिकारी

# विषयानुक्रम

# प्रकरण १ : विषयप्रवेश

हे पुस्तक तयार करताना मराठी अभ्यासकाची बुद्धीची कुवत किमान १८ वर्षांची आणि शैक्षणिक योग्यता किमान ८ व्या इयत्तेची मानली आहे. या इयत्तेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला शब्द, वाक्य, वाक्याची रचना, त्याचा अर्थ, प्रयोग, काळ वगैरेची सामान्य माहिती झालेली असते. याहून अधिक माहितीची व व्याकरणाच्या परिभाषेची अपेक्षा आम्ही बाळगलेली नाही. तेवढ्या व्याकरण-ज्ञानाचा पाया धरूनच या 'गुजराती भाषा प्रवेशा'ची रचना केली आहे.

गुजराती-मराठी भाषांची कुळी एकच आहे व त्या बहिणीबहिणी आहेत. याचाच अर्थ त्या दोन्हींत साम्य बहुत आहे. शब्दांचे नामादिप्रकार तसेच आणि तितकेच, विभक्त्या तशाच व तितक्याच, लिंग-वचने सर्व मराठी-सारखीच. फरक काय तो शब्दांचे स्वरूप, प्रत्यय, उपसर्ग यांत. म्हणून अभ्यासकाच्या हाती मराठीची काठी देऊन त्याला गुजरातीची पाउले टाकायला लावणे सहज शक्य आहे. पण अभ्यासकाने हे लक्षात ठेवावे की हा फक्त पांगुळगाडा आहे, याने पाउले टाकण्याला फक्त मदत होईल, पण पाउले टाकण्याचा व पुढे भरभर ती टाकीत राहण्याचा सराव अभ्यासकाने स्वतःच केला पाहिजे. तो जितका होईल तितकी भाषा लवकर अवगत होत जाईल. त्याकरिता मदत म्हणून अभ्यासकाला प्रत्येक पाठाच्या म्हणजे प्रकरणाच्या शेवटी 'अभ्यास' म्हणून काही वाक्ये वगैरे करायला देऊ. ती अभ्यासकाने पाठातील सूचना लक्षात घेऊन करावीत; ती बरोबर की चूक हे प्रकरणाच्या शेवटी परिशिष्टात 'उत्तरे' म्हणून जो भाग देऊ त्यावरून समजेल. अभ्यासकाला स्वतःच्या वाक्यांशी ती ताडून पाहता येतील व योग्य ती सुधारणा करून घेता येईल.

आपल्याला कामचलाऊ गुजराती आले पाहिजे, म्हणजे गुजराती माणसाशी शुद्ध रीतीने बोलता आले पाहिजे, त्याच्याशी कामापुरता पत्रव्यवहार करता आला पाहिजे, गुजराती वृत्तपत्रे, मासिके, कथा-कादंबऱ्या वाचून समजल्या पाहिजेत, हे उद्दिष्ट हे पुस्तक लिहिताना मनापुढे ठेवले आहे. मराठी माणसाला गुजराती लिपीपासून प्रारंभ करावा लागेल. मराठी लिपीहून ही

लिपी फारच थोड्या फरकाने भिन्न आहे, त्यामुळे ती लक्षात यायला वेळ लागणार नाही. गुजरातीत कांही स्वरांचे खास उच्चार आहेत, तेही समजून घेतले पाहिजेत. मग शब्दांची मांडणी कशी असते, कितीतरी मराठी व गुजराती शब्द कसे समान आहेत, शब्दांचे एकमेकांशी वाक्यात संबंध कशा रीतीने जोडले जातात, विशेष ध्यानात ठेवण्याच्या गोष्टी कोणत्या आहेत हे समजावून घेणे अवश्य आहे. यायोगे आपली आपल्याला मराठीची गुजराती वाक्ये बनविता येऊ लागतील, गुजराती दिलेली वाक्ये अर्थासह लक्षात भरू लागतील. यानंतर बोलचालीची तयारी होते. ती बोलचालीची भाषा, तसेच पत्रे लिहिण्याची रीत, वृत्तपत्रीय भाषा, गोष्ट सांगण्याची रीत वगैरे आपल्याला थोडेथोडे समजावून घ्यायचे आहे.

त्याकरिता नामांचा, विशेषणांचा, क्रियावाचक शब्दांचा व अव्ययांचा शब्दसंग्रह आपल्याकडे थोडाफार असला पाहिजे. तो त्या त्या ठिकाणी अभ्यासकाच्या उपयोगापुरता आम्ही देऊ. पुस्तकाच्या शेवटी या पुस्तकात आलेल्या सर्व गुजराती शब्दांचा अर्थासह कोशही देऊ ज्यामुळे अभ्यासकाला पटदिशी ते ते शब्द सापडू शकतील.

गुजरातीतील काही शब्द मराठीतही आपल्याला जसेच्या तसे आढळतील, पण त्यांचे अर्थ मात्र वेगळे असतील. उदा०—'आवडवुं' हे गुजराती क्रियापद. या शब्दाचा अर्थ मराठी माणसाला 'आवडणे' असा वाटतो, पण त्याचा अर्थ आहे 'अवगत असणे, येणे'. 'मने गुजराती आवडे छे' म्हणजे 'मला गुजराती येते' ('आवडते' नाही). 'गोठवणे' यासारखाच गुजराती 'गोठववुं' शब्द आहे. मराठी 'गोठवणे' याचा अर्थ 'गोठायला–थिजायला–लावणे' असा होतो, पण गुजराती त्याच शब्दाचा अर्थ 'व्यवस्था लावणे' असा होतो. 'लुगडुं' या गुजराती शब्दासारखाच मराठी 'लुगडे' शब्द आहे. पण गुजराती शब्द 'कपडा' या अर्थी सर्वत्र लागू होऊ शकतो, तर मराठी 'लुगडे' फक्त बायकांपुरतेच लागू होते. अशा काही गमती मराठीतून गुजरातीचा व गुजरातीतून मराठीचा अभ्यास करताना आढळून येतात.

हे सर्व समजायचे तर भाषेचा व्यवस्थित अभ्यास झाला पाहिजे. तो आपण पुढील प्रकरणांतून करू.

# प्रकरण २ : लिपिपरिचय व उच्चार

१. गुजराती वर्णमाला मराठी वर्णमालेसारखीच आहे. 'अ' पासून 'ज्ञ' पर्यंत सर्व अक्षरे तितकीच आहेत—म्हणजे ४९ आहेत. मराठीत 'क्ष' आणि 'ज्ञ' स्वतंत्र वर्ण मानून त्यांना वर्णमालेच्या शेवटी लिपीत स्वतंत्र स्थान देण्यांत आले आहे. गुजरातीत 'क्ष' आणि 'ज्ञ' ही अनुक्रमे 'क्+ष' व 'ज्+ञ' अशी जोडाक्षरे मानून त्यांना 'क' वर्गात व 'च' वर्गात घालण्यात आले आहे. मात्र ते दोन उच्चार दोन स्वतंत्र अक्षरांनी मराठीतल्यासारखेच दाखविले जातात. म्हणून लिपीचा विचार करताना ती चिन्हे ४९ अक्षर-चिह्नांत आम्ही धरली आहेत.

२. आता गुजराती लिपी प्रत्यक्ष समजून घेऊ :

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्वर : | અ | આ | ઇ | ઈ | ઉ | ઊ | | ઋ |
| | अ | आ | इ | ई | उ | ऊ | | ऋ |
| | એ | ઐ | ઓ | ઔ | અં | અઃ | | |
| | ए | ऐ | ओ | औ | अं | अः | | |
| व्यंजने : | ક | ખ | ગ | ઘ | ઙ । | ચ | | છ |
| | क | ख | ग | घ | ङ | च | | छ |
| | જ | ઝ | ઞ । | ટ | ઠ | ડ | | ઢ |
| | ज | झ | ञ | ट | ठ | ड | | ढ |
| | ણ । | ત | થ | દ | ધ | ન । | | પ |
| | ण | त | थ | द | ध | न | | प |
| | ફ | બ | ભ | મ । | ય | ર | | લ |
| | फ* | ब | भ | म | य | र | | ल |
| | વ । | શ | ષ | સ । | હ | ળ | ક્ષ | જ્ઞ |
| | व | श | ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ |

ही अनुक्रमे ક્+ષ व જ્+ઞ ची बनलेली जोडाक्षरे आहेत.

* फ हे अक्षर 'ફ' असेही लिहितात.

३. वरील अक्षरचिह्नांवरून आपल्याला दिसून येते की गुजराती लिपी ही वस्तुतः नागरी लिपीच आहे. मराठी लिपी हीसुद्धा नागरी अथवा देवनागरी लिपी आहे. फक्त काही अक्षरांच्या लपेट्यांमुळे आणि वळणांमुळे गुजराती लिपी निराळी असल्यासारखे एकदम वाटते. उदा० मराठी 'अ' आणि गुजराती 'અ' यांत फक्त 'अ' च्या खालच्या अंगाचा लपेट गुजरातीत नंतरच्या काऱ्याकडे घेतला गेला. आता 'क' पहा. मराठी 'क' आडवा केला की गुजराती 'ક' होतो.

मोठ्या जाणवणाऱ्या फरकाची अक्षरे 'ઈ', 'ખ'; ' જ', 'ઝ', 'ણુ', 'ફ', 'ભ' ही आहेत.

४. गुजराती लिपीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे अक्षरावर रेघ (शिरोरेखा) नसते.

## उच्चार

५. गुजरातीतील वर्णांचे उच्चार मराठी वर्णोच्चारांसारखेच आहेत. गुजरातीत उच्चाराच्या दृष्टीने मराठीपेक्षा दोन स्वर अधिक आहेत. ते म्हणजे 'ए' व 'ऐ' यांच्या मधला 'आये' सारखा होणारा उच्चार आणि 'ओ' व 'औ' यांच्या मधला 'आव्' सारखा होणारा उच्चार. उदाहरणार्थ, पुढील शब्द पहा :

(१) એદી, એન, એબ, એરણ. येथे 'એરણ'चा उच्चार 'एरण' असाही नाही किंवा 'ऐरण' असाही नाही; तर तो 'आयेरण' अशासारखा आहे. याच रीतीने 'आयेदी', 'आयेब' इ.

(२) ઓલાદ, ઓલિયો, ઓશિંકળ, ઓસાન. येथे 'ઓલાદ' चा उंचार मराठीच्या 'ओलाद'सारखाही नाही किंवा 'औलाद'सारखाही नाही. तो आहे 'आव्लाद'सारखा. मात्र लिहिताना हे शब्द वर लिहिले तसेच, म्हणजे 'એદી', 'ઓલાદ' असेच लिहिले जातात. यांच्या उच्चारांचे विशेषत्व दाखविण्याकरिता 'जोडणीकोशां'त ते 'ઍદી' 'ઑલાદ' असे, म्हणजे उलटी मात्रेची खूण करून दर्शविले आहेत.

६. व्यंजनांच्या बाबतीत 'च'वर्गातील सर्व वर्णांचे उच्चार

संस्कृतातल्या किंवा हिंदीतल्यासारखेच जरा पसरट, म्हणजे 'चतुरा'तील 'च'सारखे, होतात, 'चमचा' यातील 'च'सारखे नाहीं.

७. गुजराती अनुनासिकांचा उच्चार हीसुद्धा एक लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट आहे. मराठीत अनुनासिकांचे उच्चार दोन तऱ्हेने होतात : (१) 'अंग', 'चंचल', 'पांडव', 'चंदन', 'संपूर्ण' या शब्दांतील उच्चाराप्रमाणें; म्हणजे 'अङ्ग', 'चञ्चल', 'पाण्डव', 'चन्दन', 'सम्पूर्ण' असा परसवर्णांचा वापर करून होणारा. (२) दुसरा य, र, ल, व, श, ष, स, ह यांच्यापूर्वी येणाऱ्या अनुनासिकाचा उच्चार; उदा०, संयम, सिंह, शींव, संल्लग्न, आंस, अंश इ.

गुजरातीत हे दोन तऱ्हेचे अनुनासिकाचे उच्चार तर होतातच, पण तिसराही एक प्रकार आहे; तो म्हणजे ज्या वर्णावर शीर्षबिंदू असेल तो वर्ण नाकात उच्चारायचा. उदा० 'વાંચવું', 'સાંચો', 'સાંકળ' 'ગાંધી' इ. यांचे उच्चार 'વાઞ્ચવું', 'સાઞ્ચો', 'સાઙ્કળ', 'ગાન્ધી' असे करणे चुकीचे मानले जाते.

८. 'ज्ञ' चा उच्चार गुजराती माणसे 'ग्न' असा करतात. 'ज्ञान' चा उच्चार 'ग्नान' करतात.

## बाराखडी

९. मराठीत ज्या प्रमाणे 'आ'काराकरिता काना (ा), ऱ्हस्व 'इ'-काराकरिता (ि) अशी व दीर्घ 'ई'काराकरिता (ी) अशी वेलांटी, ऱ्हस्व 'उ'काराकरितां (ु) व दीर्घ 'ऊ'काराकरिता (ू), 'ए'काराकरिता (े) व 'ऐ'काराकरिता (ै), अशा मात्रा वापरतात व अशा रीतीने सर्व बाराखडी बनते तीच तऱ्हा गुजरातीचीही आहे. काही अक्षरांच्या बाबतीत मात्र वैशिष्ट्ये आहेत. पुढे 'क' वर्गाचे उदाहरण दिले आहे त्यावरून बाराखडीची सर्वसामान्य रीत समजून येईल :—

ક, કા, કિ, કી, કુ, કૂ, કે, કૈ, કો, કૌ, કં, કઃ

याचप्रमाणे इतर सर्व अक्षरांच्या बाबतीत समजावे. वैशिष्ट्ये आहेत ती पुढीलप्रमाणे :—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| જા | જી | જુ | જૂ | રુ |
| जा | जी | जु | जू | रू |

१०. आता जोडाक्षरे :

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ક્ક | ક્ય | ક્ત | ખ્ખ | ઙ્ક | ચ્ચ | ચ્છ | જ્જ |
| क्क | क्य | क्त | ख्ख | ङ्क | च्च | च्छ | ज्ज |
| જ્દ | દ્ય | દ્દ | દ્ધ | દ્મ | ફ્ફ | બ્બ | |
| ज्द | द्य | द्द | द्ध | द्म | फ्फ | ब्ब | |

इतर जोडाक्षरे मराठीतल्याप्रमाणे समजावीत.

उदा० **બ્રાહ્મણ, રાષ્ટ્ર, વિઘ્ન, નમ્ર, વિપ્ર, પત્ર, પર્યાપ્ત ઇ.**

गुजराती अक्षरे वाचण्याकरिता व लिहिण्याकरिता इतकी लिपीची व उच्चारांची ओळख पुरेशी आहे.

## अभ्यास

१. खाली दिलेले मराठी शब्द वाचा :

અખંડ, અજગર, અચ્છેર, આઈ, આદમી, આચાર, ઇરાણ, ઇલાજ, ઇચ્છા, ઇતિહાસ, ઇશ્વર, ઇર્ષા, ઇશાન્ય, ઉગવતી, ઉદાહરણ, ઉત્તર, ઉરભાન, ઊદ, ઊભ, ઊર્મિ, ઊસ, એકનાથ, એકએકટા, એરંડવન, એખતપૂર, ઐક્ય, ઐશ્વર્ય, ઐરણ, ઐચ્છિક, ઓરખડા, ઓરડા, ઓલા, ઔત, ઔષધ, ઔપચારિક, અકૃત્રિમ, આક્રંદ, આક્રમણ, આફ્રિકા, કાંચન, કિંકિણી, કૃષ્ણ, ક્રિયાકર્મ, જાણેયેણે, જુગાર, જિતરાપ, જીવન.

२. खाली दिलेले गुजराती शब्द गुजराती लिपीत लिहा व वाचा* :

अजमो, अक्कर्मी, अखतरो, अजाण, आंक, आमडछेट, आजो, आचीजी, आमळो, आखो, इत्तरडुं, इश्क, ईचडुं, ईमान, कामराज, किमया, कृश, आक्रोश, खरेखर, खसूस, खजूर, खीर, खोड, नख्खोद, चरोतर, चौत्रीस, चाणक्य, चाखवुं, अच्छत, जबरो, जीवणजी, जोखम, जिवाडवुं, जुल्म, जूज, झेर, झाल्वुं, झभ्भो, झुलसवुं, झवेरभाई, दांत, दीपज्योत, दिनकर, द्राख, द्रुत, फाल्गु, फिरदौसी, फुरसद, फकरो, फकीरी, बकरो, बूमबराडा, बाहोशी, बृहत्रय, ब्राह्मण, भूदान, भ्रष्ट, भृगु, भीमाभाई, भास्कराचार्य, लक्ष्मण, लज्जत, लाखेणुं, लुच्चु, लोभियुं, हळ, होळी, हाजरी, ऱ्हस्व, होजरी.

---

* लक्षांत ठेवा की 'च'वर्गाच्या सर्व वर्णांचा उच्चार संस्कृतप्रमाणे किंवा हिंदीप्रमाणे (म्हणजे 'चातका'तील 'च'प्रमाणे) होतो.

# व्याकरण खंड

## प्रकरण ३ : शब्दविचार

१. आपण लिपीची ओळख करून घेतली. आता याच लिपीत खाली दिलेला मजकूर वाचण्याचा प्रयत्न करा :

લોકસાહિત્યમાં હૃદયનું સમાધાન એ જ મુખ્ય નિયમ હોય છે, સાર્વત્રિક સહાનુભૂતિ એ જ તેનો આદર્શ છે. સ્વભાવનું નિરીક્ષણ એ જ તેની શક્તિ છે. તેથી જ જાણ્યે કે અજાણ્યે લોકસાહિત્ય આદર્શ દુનિયા ખડી કરે છે. યથાર્થ વર્ણન કરતાં છતાં આદર્શનો ખ્યાલ આપવો એ લોકસાહિત્યની ખાસ ખૂબી છે. કરોડો લોકો એ આદર્શ પ્રમાણે જ વસ્તુઓની વ્યક્તિઓની અથવા ઘટનાઓની કિંમત આંકે છે.

२. वरील परिच्छेद वाचताना त्याचा सगळा अर्थबोध कदाचित तुम्हांला झाला नसेल, पण काही काही शब्द अगदी परिचयाचे, नव्हे आपलेच असे, खात्रीने वाटले असतील. असे कोणते कोणते शब्द आहेत ते आपण निवडून काढू या :

लोकसाहित्य, हृदय, समाधान, मुख्य, नियम, सार्वत्रिक, सहानुभूति, आदर्श, स्वभाव, निरीक्षण, शक्ति, दुनिया, यथार्थ, वर्णन, खूबी, करोडो, लोक, प्रमाणे, वस्तु, व्यक्ति, अथवा, घटना, किंमत.

हे सर्व शब्द मराठीत आहेत, म्हणूनच वरील परिच्छेद आपल्याला ओळखीचा वाटला. वरील २३ शब्दांपैकी १९ शब्द संस्कृत आहेत. त्यांना 'तत्सम' म्हणजे संस्कृत शब्द म्हणतात. उरलेल्या ४ शब्दांपैकी 'दुनिया' व 'किंमत' हे शब्द अरबी, 'करोडो' हा हिंदी आणि 'खूबी' हा शब्द फारसी आहे. यावरून मराठीतल्याप्रमाणेच गुजरातीतही तत्सम संस्कृत व तत्सम अरबी-फारसी-इंग्रजी शब्द आहेत हे आपल्याला दिसून येते. बाकीचे शब्द संस्कृत किंवा अरबी-फारसी-इंग्रजी किंवा अशाच इतर भाषांपासून बनलेले-बनविलेले आपल्याला आढळून येतात. त्यांना 'तद्भव' म्हणजे त्या त्या मूळ भाषांच्या शब्दांपासून घडलेले असे म्हणतात. उदा० 'ख्याल'; हा शब्द फारसी 'खयाल' या शब्दापासून बनलेला आहे. असे शब्द

घडविण्याची निरनिराळ्या भाषांची निरनिराळी लकब किंवा शैली असते. उदाहरणार्थ, 'गर्भागार' या संस्कृत शब्दापासून मराठीत 'गाभारा' व गुजरातीत 'गभारो' असे शब्द बनले आहेत.

३. शब्दांचा वापर करताना आपण त्यांची बहुवचने करतो किंवा जरुरीप्रमाणे विभक्तीचे वा अव्ययांचे प्रत्यय त्यांना जोडतो. पण हे करताना शब्दाच्या मूळरूपात फरक करतो. त्याला मराठी व्याकरणात 'सामान्यरूप' व गुजरातीत 'अंग' करणे म्हणतात. उदाहरणार्थ 'तो' चे 'त्याच्या', 'राम' चे 'रामाच्या', 'पडदा' चे 'पडद्याच्या' असे फरक घडतात. हे फरक होताना काही नियम लागू होतात असे आपल्याला दिसून येते. 'राम' हा 'अ'कारान्त पुल्लिंगी शब्द आहे. 'पडदा' हा पण पुल्लिंगीच शब्द आहे पण त्यांतील 'दा' चे 'द्या' असे सामान्यरूप होते. 'काम' हा नपुंसकलिंगी शब्द आहे त्याचे बहुवचन 'कामे' असे होते व पुढे शब्दयोगी अव्यय 'वर' हे लावायचे झाले तर 'कामा' असे त्याचे सामान्यरूप होते, तेच 'जानवे' हा नपुंसकलिंगीच शब्द घेतला तर त्याचे 'जानव्या' असे रूप बनते. यावरून शब्दांच्या लिंगांना त्याचप्रमाणे त्यांच्या अंत्य स्वरांना असे फरक घडून येतांना महत्त्व आहे हे आपल्या लक्षात आले. गुजरातीतही मराठीतल्याप्रमाणेच घडते. म्हणून गुजराती शब्दांचे सुद्धा अंत्य स्वर व जाती पाहणे अवश्य असते. उदाहरणार्थ, 'છોકરો' (मुलगा) या पुल्लिंगी शब्दाचे बहुवचन 'છોકરાઓ' आणि प्रत्यय लागताना 'છોકરા ઉપર' असे त्याचे सामान्यरूप होते तर 'મહેલ' या पुल्लिंगीच शब्दाचे बहुवचन 'મહેલો' व प्रत्ययपूर्वरूप 'મહેલમાં' असे होते. 'નિશાળ' (शाळा) या स्त्रीलिंगी शब्दाचे बहुवचन 'નિશાળો' आणि सामान्यरूप 'નિશાળ પર' असे होते तर 'કૂંચી' (किल्ली) या स्त्रीलिंगीच शब्दाचे बहुवचन 'કૂંચીઓ' व सामान्यरूप 'કૂંચી પર' असे होते. तेव्हा गुजराती शब्द वापरताना सुद्धा शब्दांच्या अंत्यस्वराकडे व जातीकडे लक्ष पुरविणे अवश्य आहे एवढे आपल्या ध्यानात आले. गुजरातीतील सर्व शब्दांची अंत्यस्वरानुसार वर्गवारी केली तर असे स्वर गुजरातीत – अ आ, इ, ई, उ, ऊ, उं, ए, ओ असे येतात. उदाहरणार्थ पुढील शब्द पाहा : પુસ્તક, ઘા, ગતિ, ધોબી, ડગુમગુ, ચાલવું, તે, ગવૈયો. अर्थात हे सर्व शब्द व्ययी म्हणजे बदल होणारे आहेत, अव्ययी नाहीत. अव्ययी शब्दांचा म्हणजेच अव्ययांचा वरील संदर्भात विचार करण्याचे प्रयोजनच नाही.

४. येथे आपण शब्दांचाच वरवरपरिचय करून घेतला आहे. त्यांच्या खोलांत शिरलेलो नाही. ते पुढे शिरावयाचे आहे. भाषा म्हणजे शब्दयोजना —शब्दांची मांडणी. एकेक शब्दाला एक किंवा अनेक अर्थ आपण देतो आणि आपल्या कथनात योग्य तेथे उपयोग करतो. शब्द हा मनातल्या अर्थाचा किंवा भावाचा संकेत किंवा बाह्य चिह्न आहे. विशिष्ट अर्थांना किंवा भावांना आपण विशिष्ट शब्दांचे संकेत देतो आणि ते भाव प्रकट करण्याचा प्रयत्न करतो. अर्थात हा केवळ प्रयत्नच असतो. भाषांचा वापर वर्षानुवर्षे रूढ झालेला असला आणि मनुष्याच्या बुद्धिचातुर्यामुळे भाव किंवा मनातला अर्थ अधिक चांगल्या रीतीने, अधिक स्पष्टपणे, उमटावा याकरिता अनेक नवीन नवीन संकेतांची भाषेत भर पडली असली तरी या संकेतांनी म्हणजेच शब्दांनी मन पूर्णपणे प्रकट करणे हे माणसाला तितकेसे अजून साधलेले नाही. म्हणून व्यवहारातील चलनामुळे नाना परिस्थितीतून, घटनातून, वापरातून, भाषांच्या परस्परसंबंधातून, गरजेतून शब्दांची उत्पत्ती, बनावट, अर्थवाहित्व आणि परिणाम घडून येत असले तरी त्यांची शक्ती मनातल्या अर्थाला किंवा भावाला पूर्णपणे व्यापू शकलेली नाही असे अनुभवाला आले आहे. म्हणूनच शब्द हे केवळ संकेतस्वरूपच मानलेले आहेत. निरनिराळ्या समाजांत, निरनिराळ्या व्यवहारांत शब्द तेच असूनसुद्धा त्यांचे अर्थ मात्र कुठे कुठे भिन्न झालेले आपल्याला त्यामुळेच आढळून येतात. मराठी-गुजरातीमधील शब्दांच्या बाबतीत तीच स्थिती आहे. उदाहरणार्थ, 'उपलाण' हा शब्द मराठीतही आहे आणि गुजरातीतही आहे. पण मराठीत त्याचा अर्थ 'खोगीर न घातलेले (घोडे)' असा आहे, तर गुजरातीत 'वरच्या बाजूचे' असा आहे. 'उद्यत' हा तत्सम शब्द मराठीत 'तयार', 'सज्ज' हा अर्थ दर्शवितो, तर गुजरातीत त्याचाच अर्थ 'उद्यमी', 'चिकाटीने काम करणारा' असा होतो. पण असे तत्सम शब्द मराठीत व गुजरातीत भिन्न अर्थ असणारे थोडे आहेत. सर्वसामान्यपणे तत्सम शब्द दोन्ही भाषात समानार्थानेच वापरले जातात असे म्हणावयास हरकत नाही. जी गोष्ट संस्कृत तत्सम शब्दांची तीच विदेशी तत्सम शब्दांची समजावी.

*

# प्रकरण ४ : नामविचार

१. विशेषनाम, सामान्यनाम, भाववाचक नाम वगैरे नामांच्या जाती गुजराती भाषेंत मराठीतल्याप्रमाणेच आहेत. मराठीत भाववाचक नामे जशी 'पणा', 'ता' असे प्रत्यय लावून, किंवा विशेषणाला अथवा क्रियापदाला 'विशिष्ट स्वरूप देऊन बनविली जातात तशी गुजरातीतही बनविली जातात; मात्र 'पणा' ऐवजी 'पणुं' असा नपुंसकलिंगदर्शक व 'आश' असा स्त्रीलिंगदर्शक प्रत्यय गुजरातीत लागतो. उदा० 'મૂર્ખપણું' (मूर्खपणा), 'રતાશ' (लाली) वगैरे. संस्कृत भाषेत बनणारी गुणदर्शक किंवा भावदर्शक नामे मराठीत व गुजरातीतही जशीच्या तशी चालतात; उदा०–'देवत्व', 'धैर्य' इ. काही गुजराती भाववाचक नामे ओळख होण्याकरिता पुढे देत आहे :

**સારપ** (चांगुलपणा), **કડવાશ** (कडूपणा), **ડહાપણ** (शहाणपणा), **શાણુપણું** (शहाणपणा–समजूतदारपणा), **ધીરજ** (धैर्य), **તરસ** (तहान), **કસરત** (व्यायाम), **ધમાલ** (गडबड), **લંબાઈ** (लांबी), **ઊંડાણ** (खोली), **ભલાઈ** (भलेपणा).

२. मागील प्रकरणात आपण गुजराती शब्दांचे अंत्यस्वर कोणते असतात ते पाहिले. हेच स्वर गुजराती नामवर्गाचेही आहेत. ते म्हणजे—

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऊं, ए, ओ.

त्यांची निवडक उदाहरणे पुढीलप्रमाणे :

(१) **કળશ** (कळस), **તા** (ताव–कागदातला), **ભોઈ**, **ચપ્પુ** (चाकू), **ભે** (भय), **કકડો** (तुकडा)

—ही पुल्लिंगी सामान्यनामे

(२) **જમીન**, **જગા** (ठिकाण), **શીશી** (कुपी), **ગોરાંદે** (गोरी स्त्री), **ઘો** (घोरपड)

—ही स्त्रीलिंगी सामान्यनामे

(३) **ફાનસ** (कंदील), **પાણી**, **મરચું** (मिरची)

—ही नपुंसकलिंगी सामान्यनामे

तीन्ही लिंगांत विभागणी करून ही निरनिराळ्या स्वरांनी अंत होणारी नामे मुद्दाम निवड करून दिली आहेत. गुजरातीत मराठीप्रमाणेच तीन लिंगे —पुल्लिंग, स्त्रीलिंग, नपुंसकलिंग अशी—आहेत हे यावरून समजून येईलच.

प्रत्येक लिंगाचे जे अनेक शब्द दिले आहेत त्यांवरून असे दिसून येते की—

(१) पुल्लिंगी नामांच्या अंती सामान्यतः अ, आ, इ, उ, ए व ओ हे स्वर येतात;

(२) स्त्रीलिंगी नामांच्या अंती सुद्धा अ, आ, ई, ए व ओ हे स्वर येतात;

(३) नपुंसकलिंगी नामांच्या अंती अ, ई व ऊ हे स्वर येतात.

म्हणजे अ, आ, ई, ए व ओ हे अंत्य स्वर तीन्ही लिंगात समानपणे येतात; तर मग कोणता शब्द कोणत्या लिंगाचा हे ओळखायचे कसे? अर्थात अभ्यासाने व वापर झाल्यानेच ते समजून येणार हे उघड आहे. पण सामान्यपणे—

(१) ज्या नामाच्या अंती 'ओ' स्वर एकवचनात येतो ते नाम 'पुल्लिंगी', जसे, ઘોડો, છોકરો, દીવો वगैरे;

(२) ज्या नामाच्या अंती 'ई' येते ते नाम स्त्रीलिंगी, जसे, બૈરી (स्त्री, पत्नी), છોકરી, ભાભી (भाशी) वगैरे; आणि

(३) ज्या नामाच्या अंती 'ऊं' येतो ते नाम नपुंसकलिंगी, जसे, કૂતરું, બિછાનું, શીંગડું, વગેરે;

—असे निश्चितपणे समजण्यास हरकत नाही. या नियमाचा उपयोग आपल्याला विशेषतः विशेषणाचे शब्द वापरताना होऊ शकतो. मराठीत जसे आपण 'चांगला मुलगा' यांत 'चांगला' हे विशेषण पुढच्या 'मुलगा' या पुल्लिंगी नामाशी म्हणजे विशेष्याशी संबंध असल्यामुळे बनवितो, विशेष्य जर 'मुलगी' असेल तर 'चांगली' आणि 'मूल' असेल तर 'चांगले' असे बनवितो, त्याच रीतीने गुजरातीतही विशेष्याच्या लिंगानुसार विशेषण हे 'ओ'कारान्त, 'ई'कारान्त किंवा 'ऊं'कारान्त करावे लागते. उदा०,

'સારો છોકરો', 'સારી છોકરી', 'સારું છોકરું' अशी विशेषणाची रूपे बनतात.

३. मराठीतल्याप्रमाणेच गुजरातीतही संस्कृत, अरबी, फारसी, अशा इतर भाषांतून जसेच्या तसे शब्द आहेत; बहुधा त्यांची लिंगे गुजरातीत त्यांच्या मूळ भाषांतल्याप्रमाणेच असलेली आढळतात; उदा०, अंत (पु.), जरा (म्ह० म्हातारपण) (स्त्री.), भोजन (न.) ही संस्कृत नामे मराठीत व गुजरातीत समलिंगी आहेत. अरबी नामे 'नाझीम' (पु.) म्हणजे 'सर्वांत वरिष्ठ सत्ताधिकारी', 'दलील' (स्त्री.) (युक्तिवाद) ही नामे सुद्धा समलिंगी आहेत.

या नियमाला अपवादही आहेतच. उदा०, 'दृष्टान्त' हे संस्कृत नाम मराठीत पुल्लिंगी आणि गुजरातीत नपुंसकलिंगी आहे. 'पशु', 'पक्षी' ही नामे संस्कृतप्रमाणे मराठीत पुल्लिंगी तर गुजरातीत नपुंसकलिंगी आहेत. 'तहनामा' हे फारसी नाम मराठीत तत्सम असून ते पुल्लिंगी आहे, गुजरातीत त्याचे 'તહનામું' रूप होते व ते नपुंसकलिंगी आहे.

म्हणून मराठीत असलेली जी तत्सम नामे ज्या लिंगांची ती गुजरातीत त्याच लिंगाची असणार असे समजून चालता येणार नाही हे वरील उदाहरणां-वरून स्पष्ट होते.

इंग्रजी, पोर्तुगीज इ. विदेशी भाषांच्या सामान्य नामांना मुळात लिंगे नसतात. पण ती नामे देशी भाषांत येताना त्या त्या भाषेच्या शैलीप्रमाणे किंवा रूढीप्रमाणे त्यांची लिंगे बनलेली आढळतात. उदा०, 'पार्लमेंट' हे नाम हिंदीत व गुजरातीत स्त्रीलिंगी व मराठीत नपुंसकलिंगी आहे; 'कोर्ट' हे नाम हिंदीत पुल्लिंगी, मराठीत नपुंसकलिंगी तर गुजरातीत स्त्रीलिंगी आहे; 'कॉलर' मराठीत स्त्रीलिंगी तर गुजरातीत पुल्लिंगी आहे म्हणून विदेशी भाषांतील लिंगे रूढ प्रयोगांत जशी असतील तशी लक्षात ठेवली पाहिजेत.

४. काही पुल्लिंगी नामांची स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी नामे विशिष्ट बदल करून बनतात. उदा० मराठींत 'कुत्रा' चे स्त्रीलिंगी 'कुत्री' व नपुंसकलिंगी 'कुत्रे', 'घोडा', 'घोडी', 'घोडे', 'बकरा' 'बकरी', 'बकरे' अशी होतात.

गुजरातीमध्येही असेच बदल होऊन पुल्लिंगी नामाचे स्त्रीलिंगी नाम बनते :

| पु. | स्त्री. | न. |
|---|---|---|
| કૂતરો, | કૂતરી, | કૂતરું |
| ઘોડો, | ઘોડી, | ઘોડું |
| બકરો, | બકરી, | બકરું |
| વાંદરો, | વાંદરી, | વાંદરું |
| બિલાડો (बोका), | બિલાડી (मांजरी), | બિલાડું (मांजर) |

काही ओकारान्त पुल्लिंगी नामांची फक्त ईकारान्त स्त्रीलिंगी नामेच होतात, नपुंसकलिंगी होत नाहीत :

| | |
|---|---|
| આગળો (अडसर) | આગળી (लहान अडसर) |
| કાકો | કાકી |
| મામો | મામી |
| ભત્રીજો (पुतण्या) | ભત્રીજી (पुतणी) |
| ભાણેજ (भाचा) | ભાણેજી (भाची) |
| આજો (आजा) | આજી (आजी) |

पुल्लिंगी नामांची अगदी वेगळ्या स्वरूपाची बनलेली स्त्रीलिंगी नामे कांही पुढे दिली आहेत :

| पु. | स्त्री. |
|---|---|
| મોર | ઢેલ (लांडोर) |
| બાપ | મા |
| દિયર (धाकटे भावजी) | દેરાણી |
| વર (नवरा) | વહુ (बायको) |
| મરદ (पुरुष) | ઓરત (स्त्री) |
| ભાઈ | બહેન |
| સસરો | સાસુ |
| બળદ | ગાય |
| રાજા | રાણી |

| पु. | स्त्री. |
| --- | --- |
| પાડો (रेडा) | ભેંસ (म्हैस) |
| કૂઓ (मावळा) | કોઈ (मावळण) |
| ભીલ (भिल्ल) | ભીલડી (भिल्लीण) |
| રજપૂત | રજપુતાણી |
| સિંહ | સિંહણ |
| વાઘ | વાઘણ |
| પટેલ (पाटील) | પટલાણી (पाटलीण) |
| સોની (सोनार) | સોનારણ (सोनारीण) |
| ધણી (मालक) | ધણિયાણી (मालकीण) |
| નાગ | નાગણ |
| હાથી | હાથણી |
| શેઠ | શેઠાણી |
| ઠાકોર | ઠકરાણી |
| કબૂતર | કબૂતરી |

ही व अशा प्रकारची अनियमित रूपे वापरानेच लक्षात राहतील.

५. काही नामे अशी गमतीची आहेत त्यांचे लिंग बदलले की अर्थ बदलतो; उदा० (१) 'કોશ' (पु.) = खजिना, व 'કોશ' (स्त्री.) = ऐदाण; (२) કળ (पु.) = गाळ (मातीचा), કળ (स्त्री.) = वेदना; (३) 'પૂંજો' (पु.) = (कचऱ्याचा ढीग), व 'પૂંજી' (स्त्री.) = संपत्ती (४) ગાળ (पु.) = चिखल, ગાળ (स्त्री.) = शिवी; (५) भात (पु.) = अन्नातील भात, ભાત (स्त्री.) = जात, प्रकार. अशी नामे सुद्धा जसजशी वाचताना लिहिताना वापरात येत जातील तशी लक्षात राहात जातील. येथे फक्त एकदा नामांचे हे प्रकार नजरेखालून जावेत म्हणून दिले आहेत.

नामांच्या बाबतीतला लिंगांचा विचार तूर्त एवढा पुरेसा आहे.

## वचनविचार

६. लिंगविचारानंतर **वचनाचा** विचार करू. मराठी-गुजरातीत दोनच वचने आहेत : एकवचन व बहुवचन. एकवचनी नामाचे बहुवचन कसे करावयाचे ? त्यासाठी काही नियम आहेत, ते पुढीलप्रमाणे :

(१) ज्या नामाच्या अंती 'अ', 'आ' 'ई' किंवा 'उ' असेल अशा नामाचे बहुवचन त्या अंत्य स्वराऐवजी 'ओ' प्रत्यय लावून करतात, मग त्याचे लिंग कोणते का असेना.

| | एकवचन | | बहुवचन |
|---|---|---|---|
| उदा०, | બળદ (बैल) | (पु.) | બળદો |
| | રાજા | (पु.) | રાજાઓ |
| | રાણી | (स्त्री.) | રાણીઓ |
| | હિવેટ | (स्त्री.) (वात) | હિવેટો |
| | પશુ | (न.) | પશુઓ |

(२) ज्याच्या शेवटी 'ओ' अंत्याक्षर असेल अशा नामाचे बहुवचन त्या अंत्य स्वराऐवजी 'आ' किंवा 'आओ' असा प्रत्यय लावून करतात. उदा०

| | |
|---|---|
| ઘોડો | ઘોડા, ઘોડાઓ |
| ડગલો (डगला) | ડગલાઓ |
| વધારો (वाढ) | વધારા, વધારાઓ |
| સુધારો (सुधारणा) | સુધારા, સુધારાઓ |

(३) ज्याच्या शेवटी 'उं' असेल त्याचे बहुवचन 'आं' हा प्रत्यय लावून करतात.

| | | |
|---|---|---|
| उदा०, | ઘરેણું (दागिना) | ઘરેણાં |
| | કપડું (कपडा) | કપડાં |
| | પારેવું (कबूतर) | પારેવાં |
| | હૈયું (हृदय) | હૈયાં |

७. (१) काही नामांचे बहुवचन होताना त्यांचे रूप बदलत नाही. उदा० 'વાળ' (केस), 'સમ' (शपथ), 'લગ્ન', 'विवाह', 'समाचार', 'ઘઉં', 'તલ' (तीळ), 'મગ' (मूग), 'મરી' (मिरे) इ.

(२) खालील नामांचे बहुवचन होत नाही. उदा० કપાસ (कापूस), ખાંડ (साखर), ગોળ (गूळ), ઘાસ (गवत), ઘી (तूप), જીરું (जिरे), દેવતા (अग्नि), પાણી, ભોંય (भुई), માટી (माती), મેથી, હળદર (हळद), हिंग.

(३) पुढील नामे बहुवचनातच असतात : માબાપ (आईबाप), હવાપાણી, પ્રણામ, ફાંફાં (व्यर्थ धडपड), ચશ્માં (चष्मा), ધાણા (धणे), ચાળા (चाळे), કાલાવાલા (आजीजी), વલખાં (व्यर्थ तडफड).

८. तेव्हा 'वचनविचारा'त आपण (१) नामांचे बहुवचन कसे करायचे, (२) कोणत्या विशिष्ट नामांचे बहुवचन होताना त्यांची रूपे बदलत नाहीत, (३) कोणत्या नामांचे बहुवचन होत नाही, व (४) कोणती नामे बहुवचनातच असतात, हे पाहिले. तूर्त एवढी माहिती आपल्याला पुरेशी आहे.

## अभ्यास

१. सदर प्रकरणात पुढील मराठी शब्दांचे गुजराती प्रतिशब्द कोणते आले आहेत ते शोधून काढून त्यांच्या लिंगांसह लिहा :—(१) तहान (२) चांगुलपणा (३) लाली (४) कुपी (५) तुकडा (६) कळस (७) कडूपणा (८) ताव (९) मूल (१०) कुत्रे (११) ऐदाण (१२) शिवी.

२. पुढील गुजराती शब्दांची लिंगे सांगून त्यांचे मराठी अर्थ द्या :—(१) ધીરજ (२) ડહાપણ (૩) ઊંડાણ (४) ધો (५) ફાનસ (૬) મરચું (૭) દીવો (૮) દલીલ (૯) દૃષ્ટાન્ત (૧૦) માખી (૧૧) કૂઓ (૧૨) બિલાડું

३. खालील प्रत्येक गुजराती नामाचे विरुद्धलिंगी नाम द्या : (૧) કાકી (२) ભાણેજ (૩) ભત્રીજી (४) भेंस (५) ગાય (૬) આગળો (૭) વર (૮) મરદ (૯) મોર (૧૦) સોની (૧૧) ભાઈ (૧૨) દિયર

४. खालील प्रत्येक नाम कोणत्या वचनाचे आहे तें लिहून त्याच्या विरुद्ध-वचनी नाम बनवून लिहा : (૧) કપડું (२) હૈયાં (૩) દિવેટો (४) વધારા (૫) બળદ (૬) ઘોડા (૭) વાળ (૮) મરી (૯) ઘી (૧૦) ઘાસ (૧૧) માબાપ (૧૨) ચશ્માં

*

# प्रकरण ५ : विभक्तिविचार

१. "रमाने कागद उचलला व पेटीत ठेवला. मुलाला काय बोलावे हे तिला कळेना. रमाची वाचाच जणू बसली."

वर एकूण पाच वाक्ये दिली आहेत. त्यांत 'रमाने', 'कागद' 'पेटीत', 'मुलाला', 'रमाची', 'वाचा' ही नामे आली आहेत, पण ती सगळी त्यांच्या मूळ स्वरूपांत नाहीत. 'रमा' या मूळ विशेषनामाची 'रमाने' व 'रमाची' अशी दोन रूपे आली आहेत. 'पेटी' या सामान्यनामाचे 'पेटीत' असे रूप झाले आहे. 'मूल' या सामान्यनामाचे 'मुलाला' असे रूप झाले आहे. अशा रीतीने एकच नाम वेगळ्या वेगळ्या रूपांत किंवा वेगळी वेगळी नामे वेगळ्या वेगळ्या रूपांत नटलेली आपल्याला दिसतात. हा जो नामांचा वेगळेपणा त्यालाच व्याकरणात 'विभक्ती' म्हणतात. हे जे वेगळे वेगळे वेष त्यानी चढविले आहेत ते त्यांना काही एक भाग त्या वाक्यात बजावायचा आहे म्हणून—मग तो आपला दुसऱ्या नामाशी संबंध दाखवायचा भाग असो की क्रियापदाशी संबंध दाखवायचा भाग असो. तशी रूपे त्या नामांनी घेतली नसती तर पहिलेच वाक्य कसे झाले असते ते पाहा :

"रमा कागद उचलला व पेटी ठेवला"....मूळ शब्द जसेच्या तसे येथे ठेवल्याने पुरता अर्थबोधच होत नाही. म्हणूनच काही प्रत्यय लावून त्यांना वाक्यात वापरावे लागते. या प्रत्ययांना 'विभक्तिप्रत्यय' म्हणतात. अर्थानुरूप अशा विभक्त्या संस्कृतात व मराठीत आठ आहेत, गुजरातीत सातच आहेत व त्या मराठीसारख्याच आहेत. त्या पुढीलप्रमाणे : प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी व सप्तमी. 'संबोधन' ही आठवी विभक्ती म्हणून गुजरातीत मानलेली नाही. ती संबोधनार्थी प्रथमा विभक्तीच मानली जाते.

२. आता आपण प्रत्येक विभक्तीचा गुजराती व्याकरणांत अर्थ म्हणजे उद्दिष्ट काय व तिचे प्रत्यय काय ते पाहू. त्यांचे खालीलप्रमाणे कोष्टक आपल्याला बनविता येईल :

| विभक्ती | अर्थ | प्रत्यय |
|---|---|---|
| प्रथमा | कर्ता, संबोधन | नाही |
| द्वितीया | कर्म | नाही<br>ने |
| तृतीया | कर्ता, करण, कारण | એ, થી |
| चतुर्थी | संप्रदान, तादर्थ्य | ને, માટે |
| पंचमी | अपादान | થી |
| षष्ठी | संबंध | * (ए.व.)નો–ની–નું<br>* (ब.व.)ના–ની–નાં |
| सप्तमी | अधिकरण | એ, માં |

येथे विभक्तीचे जे 'अर्थ' म्हणून दिले आहेत त्यांचा खुलासा करणे अवश्य आहे.

## विभक्तीचे 'अर्थ'

३. वाक्यात अमुक शब्द कोणती कामगिरी बजावतो त्यावरून त्या शब्दाचा 'अर्थ' किंवा उद्देश समजतो. प्रत्येक शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी विशिष्ट संबंध योजलेला असतो आणि त्या नियोजित संबंधाप्रमाणे त्या शब्दाची कामगिरी निश्चित झालेली असते. उदा० 'रमाने कागद उचलला' हेच वाक्य घेतले, तर त्यात 'रमा', 'कागद' ही दोन नामे आपापली विशिष्ट कामगिरी घेऊन आलेली आहेत. घडलेली क्रिया दाखविणारा शब्द जो 'उचलला' त्याच्याशी दोन्ही नामांचा संबंध आहे. उचलण्याची क्रिया झाली, पण ती कोणी केली? अर्थात 'रमाने'. तेव्हा 'रमा' या नामाची त्या वाक्यात भूमिका कर्त्याची आहे. 'उचलला', पण काय? अर्थात 'कागद'. तेव्हा 'कागद' या शब्दाने उचलण्याच्या क्रियेचे उद्दिष्ट दाखविले, त्याचीही त्या क्रियापदाच्या अनुषंगाने काही कामगिरी आहे. वाक्यातील नामांचे क्रिया दाखविणाऱ्या शब्दाशी म्हणजेच क्रियापदाशी जे संबंध त्यांना 'कारक' असे नाव दिले आहे

* ए. व. = एकवचन
ब. व. = बहुवचन

आणि त्या 'कारका'ने जे उद्दिष्ट साधले जाते त्याला 'अर्थ' असे नाव दिले आहे. 'रमाने' हा शब्द त्या वाक्यात कर्त्याची कामगिरी बजावतो म्हणून त्या कारकाचा अर्थ 'कर्ता' होतो. क्रियापदाला 'कोण' किंवा 'कोणी' असा प्रश्न विचारला असता जे उत्तर येते तो त्या क्रियापदाचा कर्ता, आणि 'काय' असा प्रश्न विचारला असता जे उत्तर येते ते त्याचे कर्म हे त्या दोन कारक-विभक्तींचे 'अर्थ' आहेत. असे संबंधांचे म्हणजे कारकांचे सात प्रकार 'अर्था'वरून व 'प्रत्यया'वरून मानण्यात आले आहेत. आपण वरील कोष्टकात पाहिले की 'प्रथमा' विभक्तीला प्रत्यय नाही, आणि तिचा अर्थ 'कर्ता' आहे, म्हणजे प्रथमा विभक्तीत असलेला शब्द कर्त्याचे काम करतो; आणि 'तृतीया' विभक्तीत असलेला शब्दसुद्धा कर्त्याचेच काम करतो, पण त्याला 'ने' हा प्रत्यय आहे, म्हणून त्याची विभक्ती वेगळी करून तिला 'तृतीया' नाव दिले आहे. उदा० 'रमाने'.

कर्म दाखविणाऱ्या शब्दाची विभक्ती 'द्वितीया' ठरविली आहे. त्या विभक्तीचा शब्द 'प्रथमे'प्रमाणेच विनाप्रत्यय असू शकतो, 'कागद' हा शब्द तसा आहे, पण तो 'कर्मा'चा अर्थ दर्शवीत असल्यामुळे त्याची विभक्ती 'द्वितीया' आहे. दुसरा द्वितीया विभक्तीचा प्रकार असा : 'रमाने कागद सखूस दिला.' येथे देण्याची क्रिया 'कोणास' उद्देशून झाली ? 'सखूस'. तेव्हा 'सखूस' हे सुद्धा 'दिला'चे कर्म आहे. आणि कर्माची विभक्ती द्वितीया असते. तेव्हा द्वितीया विभक्तीची रूपे दोन : (१) प्रत्ययविरहित, व (२) 'स' किंवा 'ला' हा प्रत्यय लावून.

'रमाने कागद सखूस हाताने दिला' या वाक्यात 'हाताने' म्हणजे हाताचे साधन करून. तेव्हा 'ने' या प्रत्ययाने 'साधन' किंवा 'करण' दाखविले. ही विभक्ती 'तृतीया' म्हटली आहे.

वरील वाक्यात 'सखूस' या शब्दाची विभक्ती द्वितीया म्हणून सांगितली, तशी ती चतुर्थीही मानतात. जे देतात ते मुख्य कर्म, त्याची विभक्ती द्वितीया, आणि ज्याला दिले जाते ते गौण कर्म, त्याची विभक्ती चतुर्थी. म्हणून त्या विभक्तीचा अर्थ 'संप्रदान'. 'मुलींना सिनेमा दाखविला', 'त्याच्या गालाला तीट आहे', या वाक्यांत 'ना', 'ला' प्रत्यय लागलेली नामे 'चतुर्थी' विभक्तीची मानली आहेत.

याचप्रमाणे 'करिता', 'साठी असे तादर्थ्य-प्रत्यय लागलेली नामेही चतुर्थी विभक्तीची मानतात; उदा० 'त्याच्याकरिता (किंवा त्याला) फुले आणली.'

'पंचमी' विभक्तीने अंतराचा किंवा पल्ल्याचा बोध होतो. 'मुंबईपासून जळगाव दूर आहे', 'कोल्हापुराहून मी आलो' अशा वाक्यांत 'पासून', 'हून', 'कडून' असे प्रत्यय लागलेले शब्द पंचमी विभक्तीचे मानावेत. 'हून', 'पेक्षा' हे प्रत्यय न्यूनता किंवा अधिकता दाखवितात, उदा० 'रामाहून लक्ष्मण गोरा आहे'; या प्रत्ययांनी दर्शविली जाणारी विभक्ती पंचमीच असते.

षष्ठी विभक्ती घेण्यापूर्वी सप्तमी घेऊ. या विभक्तीने क्रियेचे स्थान किंवा अधिष्ठान दाखविले जाते. उदा० 'रमाने कागद पेटीत ठेवला'; किंवा 'शब्द माझ्या कानी पडला', या वाक्यात 'त' किंवा 'ई' प्रत्यय लागलेले नाम सप्तमी विभक्तीचे समजायचे.

षष्ठी विभक्ती सोडून इतर या सर्व विभक्त्या 'कारक विभक्त्या' म्हणजे क्रियेशी संबंध असलेल्या विभक्त्या आहेत. षष्ठी विभक्ती मात्र शब्दाशी संबंध जोडणारी विभक्ती आहे. 'हा मुलाचा बाप आहे', 'तिकडे आमची शाळा होईल' या वाक्यात 'मूल' आणि 'बाप' किंवा 'आम्ही' आणि 'शाळा' हे दोन शब्द 'चा' किंवा 'ची' या प्रत्ययांनी जोडले आहेत, या प्रत्ययांचा क्रियापदाशी संबंध जोडला जात नाही. म्हणून या विभक्तीला 'विशेषण-विभक्ती' सुद्धा म्हणतात; कारण 'चा' प्रत्यय लागून बनणारा शब्द पुढील संबंधित शब्दाविषयी विशेषणाप्रमाणे काही विशेष सांगतो.

४. विभक्तीच्या संबंधात हे मराठीचे व्याकरण सांगितले. त्यावरून विभक्ती म्हणजे काय, त्या किती आहेत, कसकशा आहेत व त्यांचे वेगळे वेगळे प्रत्यय काय ते आपल्याला स्थूलपणे समजायला मदत झाली. गुजरातीत विभक्ति-विचार याहून काही सुद्धा वेगळा नाही. फक्त विभक्त्यांचे प्रत्यय तेवढे वेगळे आहेत. बाकी 'अर्थ' समानच आहेत. 'प्रथमा' किंवा 'પહેલી' विभक्तीचा अर्थ 'કર્તા' आहे तसा गुजरातीत 'સંબોધન'ही आहे.

एवढे लक्षात घेऊन ते प्रत्यय व त्यांची उदाहरणे पुढे देत आहे :

| विभक्ती | प्रत्यय | उदाहरण |
|---|---|---|
| પહેલી | × | રામ, હે રામ |
| બીજી | ×, ને | રામ, રામને |
| ત્રીજી | એ, થી | રામે, રામથી |
| ચોથી | ને, માટે | રામને, રામને માટે |
| પાંચમી | થી | રામથી |
| છઠ્ઠી | (एक०) નો, ની, નું | રામનો, –ની, –નું |
| | (बहु०) ના, ની, નાં | –ના, –ની, –નાં |
| સપ્તમી | એ, માં | રામે, રામમાં |

गुजरातीत षष्ठी विभक्ती सोडून इतर विभक्त्यांचे एकवचनी व बहुवचनी प्रत्यय वेगळे वेगळे नाहीत. षष्ठीचे दोन्ही वचनांचे वेगवेगळे प्रत्यय वर दिले आहेत. खरे म्हणजे ते वेगळे प्रत्यय नसून નો, ની, નું चीच बहुवचने आहेत हे सहज लक्षात येईल.

५. आता गुजराती वाक्यांत हे प्रत्यय लावून नाम चालवू या :

પહેલી — **રામ** રાજા છે (म्ह० राम राजा आहे).

બીજી — એને **નામ રામ** આપ્યું (म्ह० त्याला नाव राम दिले). (येथे 'આપ્યું' म्हणजे 'दिले' या क्रियापदाची '**નામ**' व 'રામ' ही दोन कर्मे आहेत.)

ત્રીજી — **રામે** બાણથી રાવણને માર્યો (म्ह० रामाने बाणाने रावणाला मारले). (येथे 'રામે' हा तृतीयान्त कर्ता आहे, आणि तृतीया विभक्तीचा अर्थ 'करण' म्हणजे साधन असाही असल्यामुळे 'બાણથી' ही सुद्धा तृतीया विभक्तीच आहे.)

ચોથી — સીતા **રામને** નમન કરે છે (म्ह० सीता रामाला नमन करते).

પાંચમી — લક્ષ્મણ **રામથી** દૂર જાય છે (म्ह० लक्ष्मण रामापासून दूर जातो).

છઠ્ઠી— (૧) **હનુમાન રામનો** દાસ છે (म्ह० हनुमान रामाचा दास आहे).

(૨) સીતા **રામની** પત્ની છે (म्ह० सीता रामाची पत्नी आहे).

(૩) **રામનું** ધનુષ્ય બળવાન છે (म्ह० रामाचे धनुष्य बलवान आहे).

(૪) લવ અને કુશ **રામના** પુત્રો હતા (लव आणि कुश रामाचे पुत्र होते).

(૫) **રામની** શક્તીઓ અપાર હતી (म्ह० रामाच्या शक्ती अपार होत्या).

(૬) **રામનાં** માબાપ પ્રેમાળ હતાં (म्ह० रामाचे आई-बाप प्रेमळ होते).

(येथे षष्ठीच्या एकवचनी व बहुवचनी सर्व प्रत्ययांची उदाहरणे दिली आहेत.)

સાતમી— (૧) તે **ઝાડે** ચઢે છે (तो झाडावर चढतो)—अधिकरण अर्थी.

(૨) **રામમાં** અમે ઈશ્વરને જોઈએ છીએ (म्ह० रामात आम्ही ईश्वराला पाहतो)—अधिष्ठान अर्थी.

६. गुजरातीत कित्येक नामे अशी आहेत की ज्यांना विभक्ति-प्रत्यय लागण्यापूर्वी त्यांच्या रूपांत कांही फेरफार होतो. मराठीतसुद्धा असा फेरफार होतो. त्या फेरफाराला 'सामान्यरूप' किंवा 'अंग' मराठीत म्हणतात. गुजरातीतही त्याला 'अंग' म्हणतात. 'ઘોડો' हा शब्द घेतला, तर त्याला उदाहरणार्थ द्वितीयेचा 'ने' प्रत्यय लावायचा झाला तर 'ઘોડો' चे 'ઘોડા' असे 'अंग' बनते व मग त्याला प्रत्यय लागून 'ઘોડાને' असे रूप बनते. दुसरे नाम 'છોકરું' घ्या. त्याचे 'છોકરા' असे 'अंग' बनून त्याचे उदाहरणार्थ सप्तमीचे रूप 'છોકરામાં' असे होते. बहुवचनी नामांची विभक्तिरूपे अनुक्रमे 'ઘોડાઓને', 'છોકરાંમાં' अशी म्हणजे बहुवचनाच्या रूपात काही बदल न होता नुसता प्रत्यय लागून होतात.

७. 'उ'कारान्त, 'उं'कारान्त, 'ऊं'कारान्त व 'ओ'कारान्त नामां-शिवाय इतर स्वरांनी अंत पावणाऱ्या नामांत काही बदल होत नाही.

८. अभ्यासाच्या सोयीसाठी पुढे नमुन्याची नामे चालवून दाखविली आहेत :

## पुल्लिंगी नामे

### अकारान्त—'પુરુષ'

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| १ | પુરુષ | પુરુષો |
| २ | પુરુષ, પુરુષને | પુરુષો, પુરુષોને |
| ३ | પુરુષે, પુરુષથી | પુરુષોએ, પુરુષોથી |
| ४ | પુરુષને, પુરુષને માટે | પુરુષોને, –ને માટે |
| ५ | પુરુષથી | પુરુષોથી |
| ६ | (એક૦) પુરુષનો, –ની, –નું | પુરુષોનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) પુરુષના, –ની, –નાં | પુરુષોના, –ની, –નાં |
| ७ | પુરુષે, પુરુષમાં | પુરુષોએ, પુરુષોમાં |

### आकारान्त—'રાજા'

| | | |
|---|---|---|
| १ | રાજા | રાજાઓ |
| २ | રાજા, રાજાને | રાજાઓ, –ને |
| ३ | રાજાએ, રાજાથી | રાજાઓએ, –થી |
| ४ | રાજાને, –ને માટે | રાજાઓને, –ને માટે |
| ५ | રાજાથી | રાજાઓથી |
| ६ | (એક૦) રાજાનો, –ની, –નું | રાજાઓનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) રાજાનો, –ની, –નાં | રાજાઓના, –ની, –નાં |
| ७ | રાજાએ, રાજામાં | રાજાઓએ, રાજાઓમાં |

### इ-ईकारान्त—કળિ-ળી (કલહ)

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| १ | કળી | કળીઓ |
| २ | કળી, કળીને | કળીઓ, -ને |
| ३ | કળીએ, કળીથી | કળીઓએ, -થી |
| ४ | કળીને, -ને માટે | કળીઓને, -ને માટે |
| ५ | કળીથી | કળીઓથી |
| ६ | (એક०) કળીનો, -ની, -નું | કળીઓનો, -ની, -નું |
| | (બહુ०) કળીના, -ની, -નાં | કળીઓના, -ની, -નાં |
| ७ | કળીએ, કળીમાં | કળીઓએ, કળીઓમાં |

### उ-कारान्त—સાધુ

| | | |
|---|---|---|
| १ | સાધુ | સાધુઓ |
| २ | સાધુ, સાધુને | સાધુઓ, -ને |
| ३ | સાધુએ, -થી | સાધુઓએ, -થી |
| ४ | સાધુને, -ને માટે | સાધુઓને, -ને માટે |
| ५ | સાધુથી | સાધુઓથી |
| ६ | (એક०) સાધુનો, -ની, -નું | સાધુઓનો, -ની, -નું |
| | (બહુ०) સાધુના, -ની, -નાં | સાધુઓના, -ની, -નાં |
| ७ | સાધુએ, સાધુમાં | સાધુઓએ, સાધુઓમાં |

[ दीर्घ ऊकारान्त वरीलप्रमाणेच; फक्त ऱ्हस्व 'उ' ऐवजी दीर्घ 'ऊ' करणे ]

### ओकारान्त—કૂકડો

| | | |
|---|---|---|
| १ | કૂકડો | કૂકડાઓ |
| २ | કૂકડો, કૂકડાને | કૂકડાઓ, -ને |
| ३ | કૂકડાએ, કૂકડાથી | કૂકડાઓએ, કૂકડાઓથી |
| ४ | કૂકડાને, -ને માટે | કૂકડાઓને, -ને માટે |

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
| --- | --- | --- |
| ૫ | કૂકડાથી | કૂકડાઓથી |
| ૬ | (એક૦) કૂકડાનો, –ની, –નું | કૂકડાઓનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) કૂકડાના, –ની, –નાં | કૂકડાઓના, –ની, –નાં |
| ૭ | કૂકડાએ, કૂકડામાં | કૂકડાઓએ, કૂકડાઓમાં |

## स्त्रीलिंगी नामे

### अकारान्त—બ્હેન

| | | |
| --- | --- | --- |
| ૧ | બ્હેન | બ્હેનો |
| ૨ | બ્હેન, –ને | બ્હેનો, –ને |
| ૩ | બ્હેને, બ્હેનથી | બ્હેનોએ, –થી |
| ૪ | બ્હેનને, –ને માટે | બ્હેનોને, –ને માટે |
| ૫ | બ્હેનથી | બ્હેનોથી |
| ૬ | (એક૦) બ્હેનનો, –ની, –નું | બ્હેનોનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) બ્હેનના, –ની, –નું | બ્હેનોના, –ની, –નાં |
| ૭ | બ્હેને, બ્હેનમાં | બ્હેનોએ, બ્હેનોમાં |

### आकारान्त—મા

| | | |
| --- | --- | --- |
| ૧ | મા | માઓ |
| ૨ | મા, માને | માઓ,–ને |
| ૩ | માએ, માથી | માઓએ, માઓથી |
| ૪ | માને, –ને માટે | માઓને, –ને માટે |
| ૫ | માથી | માઓથી |
| ૬ | (એક૦) માનો, –ની, –નું | માઓનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) માના, –ની, –નાં | માઓના, –ની, –નાં |
| ૭ | માએ, મામાં | માઓએ, માઓમાં |

## इ-ईकारान्त—મરઘી

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| १ | મરઘી | મરઘીઓ |
| २ | મરઘી, મરઘીને | મરઘીઓ, –ને |
| ३ | મરઘીએ, –થી | મરઘીઓએ, –થી |
| ४ | મરઘીને, મરઘીને માટે | મરઘીઓને, –ને માટે |
| ५ | મરઘીથી | મરઘીઓથી |
| ६ | (એક૦) મરઘીનો, –ની, –નું | મરઘીઓનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) મરઘીના, –ની, –નાં | મરઘીઓના, –ની, –નાં |
| ७ | મરઘીએ, મરઘીમાં | મરઘીઓએ, મરઘીઓમાં |

## 'उ'कारान्त—સાસુ

| | | |
|---|---|---|
| १ | સાસુ | સાસુઓ |
| २ | સાસુ, –ને | સાસુઓ, –ને |
| ३ | સાસુએ, સાસુથી | સાસુઓએ, –થી |
| ४ | સાસુને, –ને માટે | સાસુઓને, –ને માટે |
| ५ | સાસુથી | સાસુઓથી |
| ६ | (એક૦) સાસુનો, –ની, –નું | સાસુઓનો, –ની, –નું |
| | (બહુ૦) સાસુના, –ની, –નાં | સાસુઓના, –ની, –નાં |
| ७ | સાસુએ, સાસુમાં | સાસુઓએ, સાસુઓમાં |

## 'ओ'कारान्त—ધો

| | | |
|---|---|---|
| १ | ધો | ધોઓ |
| २ | ધો, –ને | ધોઓ, –ધોઓને |
| ३ | ધોએ, ધોથી | ધોઓએ, ધોઓથી |
| ४ | ધોને, –ને માટે | ધોઓને, –ને માટે |
| ५ | ધોથી | ધોઓથી |

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| ६ | (એક૦) ધોનો, -ની, -નું | ધોઓનો, -ની, -નું |
| | (બહુ૦) ધોના, -ની, -નું | ધોઓના, -ની, -નાં |
| ७ | ધોએ, ધોમાં | ધોઓએ, ધોઓમાં |

## नपुंसकलिंगी नामे

### अकारान्त—ફણુસ

| | | |
|---|---|---|
| १ | ફણુસ | ફણુસો |
| २ | ફણુસ, -ને | ફણુસો, -ને |
| ३ | ફણુસે, ફણુસથી | ફણુસોએ, ફણુસોથી |
| ४ | ફણુસને, -ને માટે | ફણુસોને, -ને માટે |
| ५ | ફણુસથી | ફણુસોથી |
| ६ | (એક૦) ફણુસનો, -ની, -નું | ફણુસોનો, -ની, -નું |
| | (બહુ૦) ફણુસના, -ની, -નાં | ફણુસોનો, -ની, -નાં |
| ७ | ફણુસે, ફણુસમાં | ફણુસોએ, ફણુસોમાં |

### उंकारान्त—નળિયું (कौल)

| | | |
|---|---|---|
| १ | નળિયું | નળિયાં |
| २ | નળિયું, નળિયાને | નળિયાં, નળિયાંને |
| ३ | નળિયે, નળિયેથી | નળિયાંએ, નળિયાંથી |
| ४ | નળિયાને, -ને માટે | નળિયાંને, -ને માટે |
| ५ | નળિયાથી | નળિયાંથી |
| ६ | (એક૦) નળિયાનો, -ની, -નું | નળિયાંનો,-ની,-નું |
| | (બહુ૦) નળિયાના, -ની, -નાં | નળિયાંના,-ની,-નાં |
| ७ | નળિએ, નળિયામાં | નળિયાંએ, નળિયાંમાં |

### 'ई'कारान्त—બી

| | | |
|---|---|---|
| १ | બી | બીયાં |
| २ | બી, બીને | બીયાં, બીયાંને |

| विभक्ती | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| ३ | બીએ, બીથી | બીયાંએ, બીયાંથી |
| ४ | બીને, –ને માટે | બીયાંને, –ને માટે |
| ५ | બીથી | બીયાંથી |
| ६ | (એક૦) બીનો, –ની, –નું | બીયાંનો, –ની, –નું |
|  | (બહુ૦) બીના, –ની, –નાં | બીયાના, –ની, –નાં |
| ७ | બીયે, બીમાં | બીયાંએ, બીયાંમાં |

सर्व प्रकारची नामे कशी चालवायची ते आपण नमुन्याची नामे प्रत्यक्ष चालवून पाहिले. यावरून आणखी भिन्नभिन्नस्वरान्त भिन्नभिन्नलिंगी नामे घेऊन आपल्याला नामे चालविता येतील. विभक्तीची व विभक्तिप्रत्ययांची एवढी ओळख पुरेशी आहे.

## अभ्यास

१. पुढील नामांचे योग्य त्या विभक्तीप्रत्ययाने संबंध जोडा : (i) ગોપાળ : પુસ્તક (ii) નિશાળ : ઘડિયાળ (સ્રી.) (iii) તાનાજી : ઘોડો (iv) બચ્ચું : દડો (चेंडू) (v) છોકરાઓ : માબાપ (vi) ચોપડી (पुस्तक) : પાનાં (vii) કોળાં (भोपळे) : બિયાં (viii) શાહુકાર : દેણું (देणी)

२. पुढील शब्दांचे गुजरातीत भाषांतर करा :

(१) रेड्याला गवत (२) पर्वतीहून चार मैल (३) खिशात चाकू (४) सदऱ्याला भोके (५) हातात पुस्तके (६) झाडांना फळे (७) डोकीवर टोपी (८) दागिन्यांना मागणी.

[ **टीप** : रेडा = પાડો; गवत = ઘાસ; खिसा = ખીસું, ગજવું; चाकू = ચાકુ, ચપ્પુ (पु.); डोके = માથું; दागिना = ઘરેણું (न.) ].

# प्रकरण ६ : नामसंग्रह

अभ्यासकाला वाक्ये बनविताना नामांची गरज लागणारच. त्याकरिता नित्य-वापरात येणाऱ्या नामांचा एक छोटासा संग्रह येथे देत आहो. प्रथम शरीरावयवांची नामे, नंतर घरगुती सामानाची नामे, घराच्या भागांची नामे, काही शाकभाज्या, धान्ये, पकान्ने, फळे, झाडे, प्राणी, मसालापदार्थ, नातीगोती, तिथ्या, महिने, वाद्ये यांची नामे देऊन यांव्यतिरिक्त काही सामान्य नामेही पुढे दिली आहेत. अगोदर मराठी नाम देऊन त्याचा गुजराती प्रतिशब्द दिला आहे. नामाचे लिंगही कंसात त्याच्यापुढेच दिले आहे.

**शरीरावयव** (वरून खाली)

डोके – માથું (न.)
खोपडी – ખોપરી (स्त्री.)
मेंदू – ભેજું (न.), મગજ (न.)
केस – વાળ (पु.)
कपाळ – કપાલ(-ળ) (न.)
भुवई – ભમ(-મ્મ)ર (स्त्री.), ભવું (न.)
डोळा – આંખ (स्त्री.)
बुबुळे – આંખના ડોળા (पु. ब. व.)
(डोळ्यातील) बाहुली – આંખની કીકી (स्त्री.)
खोबण – આંખનો ગોખલો (पु.)
पापणी – પોપચું (न.)
पापणीचे केस – પાંપણ (स्त्री.)
नाक – નાક (न.)
नाकपुडी – નસકોરું (न.)
नाकपुडीतील कोवळे कातडे – નસકોરી (स्त्री.)
गाल – ગાલ (पु.)
ओठ – ઓઠ, હોઠ (पु.)
मिशी – મૂછ (स्त्री.)
दात – દાંત (न.)
हिरडी – અવાળુ (पु., न.)
जीभ – જીભ (स्त्री.)
टाळा – તાળવું (न.)
हनुवटी – હડપચી (स्त्री.)
दाढी – દાઢી (स्त्री.)
कान – કાન (पु.)
कानाचे पाळे – કાનનો ઢોળ (पु.)
कानशील, आंख – લમણું (न.), લમણો (पु.)
जबडा – જડબું (न.)
तोंड – મોઢું (न.)
मान – ડોક, ગરદન (स्त्री.)
गळा – ગળું (न.) કંઠ (पु.)
घाटा – ઘાંટી (स्त्री.), હૈડિયો (पु.)
खांदा – ખભો (पु.)
बाहु, बाहुटा – બાવડું (न.)
हात – હાથ (पु.)
मनगट – કાંડું (न.)
हाताचा पंजा – હથેળી (स्त्री.)

कोपर – કોણી (स्त्री.)
बोट – આંગળી (स्त्री.)
नख – નખ (पु.)
छाती – છાતી (स्त्री.)
बरगडी – પાંસળી (स्त्री.)
फुप्फुस – ફેફસું (न.)
खाक – બગલ (स्त्री.)
पोट – પેટ (न.)
ओटीपोट – પેડુ(-ડું) (न.)
कोठा – જઠર (न.)
आंतडे (मोठे) – આંતરડું (न.)
आंतडे (लहान) – આંતરડી (स्त्री.)
पाठ – પીઠ (स्त्री.)
पाठीचा कणा – કરોડ (स्त्री.)
कंबर – કમર (स्त्री.)
जांघ – જાંઘ (स्त्री.)
मांडी – ખોળો (पु.)
गुडघा – ઘુંટણ, ઢીંચણ (न.)
पाय – પગ (पु.)
घोटा – ઘૂંટી (स्त्री.)
टाच – એડી (स्त्री.)
अंगठा – અંગૂઠો (पु.)
कातडे – ચામડી (स्त्री.)
रक्त – લોહી (न.)
हाड – હાડ (न.)
शीर – નસ, રગ (स्त्री.)
लाळ – લાળ (स्त्री.)
थुंकी – થૂંક (स्त्री.)

## घर व घराचे भाग

घर – ઘર, મકાન (न.)
वाडा – મહેલ (पु.)
झोपडी – ઝૂંપડી (स्त्री.)
आंगण – આંગણું (न.)
सोपा, ओसरी – ઓસરી (स्त्री.)
माजघर – વચલો ઓરડો (पु.)
वरांडा – वरंडा (पु.) – ઓટલો (पु.)
खोली – ઓરડો (पु.)
स्वैपाकघर – રસોડું (न.)
संडास – સંડાસ (पु.), જાજરૂ (पु., न.)
मुत्री – મુતરડી (स्त्री.)
परसू – વાડો (पु.)
गच्ची – અગાસી (स्त्री.), ધાબું (न.)
जिना – દાદર (-રો) (पु.), સીડી (स्त्री.)
पायरी – પગથિયું (न.)
मजला – માળો (पु.)
तळमजला – ભોંયતળિયું (न.)
तळघर – ભોંયરું (न.)
छत – છત (स्त्री.), ચંદરવો (पु.)
छप्पर – છાપરું (न.)
जमीन – જમીન (स्त्री.)
जोते – પડથાર (पु.)
सज्जा – છજું (न.), ઝરૂખો (पु.)
झरोखा – ગોખલો (पु.)
खिडकी – બારી (स्त्री.)
दरवाजा – બારી (स्त्री.), બારણું (न.), દરવાજો (पु.)
दार – કમાડ (न.)
चौकट – ચોકઠું (न.)
कपाट (भिंतीतले) – ભંડારિયું (न.)
भिंत – ભીંત (स्त्री.)
मोरी – મોરી (स्त्री.)
कोपरा – ખૂણો (पु.)
टाके – ટાંકું (न.)
चौक – ચોક (पु.), આંગણું (न.)

## घरगुती सामान (ઘરવાખરો, સરસામાન) (न.)

चूल – ચૂલ(–લી) (स्त्री.)
वाइल – ઓલો (पु.)
शेगडी – શગડી (स्त्री.)
स्टोव्ह – સ્ટવો (पु.)
जळण – બળતણ (न.)
जळणाची जागा – ચૂલો (पु.)
कोळसा – કોલસો (पु.)
गोवरी – છાણું (न.)
घासलेट, राकेल – ઘાસલેટ (न.)
भांडीकुंडी – વાસણકૂસણ (न.)
भांडे – વાસણ (न.)
ताट – થાળી (स्त्री.)
वाटी – કટોરી, વાટ(–ડ)ગી (स्त्री.)
वाडगा – કટોરો, વાટ(–ડ)ગો (पु.)
तांब्या – લોટો (पु.)
पेला – પવાલું, પ્યાલું (न.)
बशी – રકાબી (स्त्री.)
तपेली – તપેલી (स्त्री.)
झाकणी – ઢાંકણું (न.)
हंडा – અંધોળિયું (न.)
पळी – કડછી (स्त्री.)
तवा – તવો (पु.)
उलथने – તવેથો (पु.)
चमचा – ચમચી (स्त्री.)
घागर – ગાગર (स्त्री.)
बादली – ડોલ (स्त्री.)
कढई – કડાઈ (स्त्री.)
पीप (पिंप) – પીપ (न.)
बंब – બંબો (पु.)
पोळपाट – આપાળિયો (पु.)
लाटणे – વેલણ (न.)
पेदाण – ઠરાઈ (स्त्री.), કોશ (स्त्री.)
वरवंटा – ઉપરવટણો (पु.)
खल-बत्ता – ખલ-બત્તો
उखळ – ઊખલી (स्त्री.)
मुसळ – મુશળ, સાંબેલું (न.)
गाळणे – ગળણી (स्त्री.)
रवणी – ખમણી (स्त्री.)
जाते – ઘંટી
चिमटा – ચીપિયો (पु.)
सांडसी – સાણસી (स्त्री.)
बरणी – બરણી (स्त्री.)
डबा – ડબ્બો (पु.)
पाट – પાટલો (पु.)
आगकाडी – દીવાસળી (स्त्री.)
काड्यापेटी – દીવાસળીની પેટી (स्त्री.)
दिवा – દીવો (पु.)
वात – દિવેટ (स्त्री.)
कंदील – ફાનસ (न.)
चाकू – ચાકુ, ચપ્પુ (पु.)
सुरी – છરી, છૂરી (स्त्री.)
कात्री – કાતર (स्त्री.)
टाचणी – ટાંચણી (स्त्री.)
सुई – સોય (स्त्री.)
दोरा – દોરો (पु.)
बटन – બોરિયું (न.)
पिशवी – થેલી (स्त्री.)
पोते – કોથળો (पु.)
धोपटणे – ધોકો (पु.)
खाट – ખાટલો (पु.)
पलंग – પલંગ (पु.)
गादी – ગાદલું (न.)
उशी – ઓશીકું (न.)
चादर (अंथरण्याची किंवा पांघरण्याची) – ચાદર (स्त्री.)
अभ्रा – ખોળિયું (न.)

कचरा – વાસીદું (न.)
बिछाना – બિસ્તરો (पु.)
अंथरूण – પથારી (स्त्री.)
पांघरूण – ઓઢો (पु.)
सतरंजी – શેતરંજી (स्त्री.)
जाजम – જાજમ (स्त्री.)
पडदा – પડદો (पु.)
आरसा – અરીસો (पु.)
कंगवा – કાંસકો (पु.)
(वीजबत्तीचा) बल्ब – ગોળો (पु.)
घड्याळ – ઘડિયાળ (स्त्री.)
कपाट – કબાટ (पु., न.)
मेज, टेबल – મેજ, ટેબલ (न.)
खुर्ची – ખુરસી (स्त्री.)
शेल्फ – અભરાઈ, છાજલી (स्त्री.)
ड्रावर – ખાનું (न.)
स्टूल – બાજઠ (पु.)
तिजोरी – તિજોરી (स्त्री.)
फुलदाणी – ફૂલદાની (स्त्री.)
पानदान – પાનદાની (स्त्री.)
पिकदाणी – થૂંકદાની (स्त्री.)
पाळणा – પાર(–ળ)ણું (न.)
झोपाळा – હીંચકો (पु.)
दोरी – દોરી (स्त्री.)
पंखा – પંખો (पु.)
खुंटी – ખીંટી, ખૂંટી (स्त्री.)
दौत – ખડિયો (पु.)
पुस्तक – પુસ્તક (न.), ચોપડી (स्त्री.)
कागद – કાગળ (पु.)
पत्र – પત્ર (न.), કાગળ (पु.)
शाई – શાહી (स्त्री.)
टीपकागद – શાહીચૂસ (पु.)

## काही शाकभाज्यांची नामे

आले – આદું (न.)
काकडी – કાકડી (स्त्री.)
कारले – કારેલું (न.)
कोथिंबीर – કોથમીર (स्त्री.)
कोबी – કોબી (स्त्री.)
कांदा – ડુંગળી (स्त्री.)
गवार – ગવાર, ગુવાર (पु.)
गाजर – ગાજર (पु. न.)
घेवडा – વાલોળ (स्त्री.)
घोसाळे – ગલકું (न.)
चिबूड – ચીભડું (न.)
टामाटो – ટમેટું (न.)
तांदुळजा – તાંદળજો (पु.)
तोंडले – ટીંડોરું (न.)
दुधी, दुध्या – દૂધી (स्त्री.)
दोडका – તુરિયું (न.)
पडवळ – પંડોળું (न.)
परवर – પરવળ (न.)
पापडी (घेवड्याची एक जात) – પાપડી (स्त्री.)
पुदीना – ફુદીનો (पु.)
फुलावर – ફુલેવર (न.)
बटाटा – બટાકો(–ટો) (पु.)
भाजी (कसलीही) – શાક (न.)
भेंडी – ભીંડો (पु.)
भोपळा (लाल) – કોળું, અદકાળું (न.)
मटार – મટર (न.)
मिरची (हिरवी) – લીલું મરચું (न.)
मिरची (लाल) – લાલ મરચું (न.)
मुळा – મૂળો (पु.)
मेथी – મેથી (स्त्री.)

रताळे – રતાળું, શકરિયું (न.)
लसूण – લસણ (न.)
लिंबू – લીંબુ (न.)
वांगे – વેંગણું, રીંગણું (न.)
शेवगा-शेंग – સરગવાની શીંગ (स्त्री.)
सुरण – સૂરણ (न.)

## काही धान्य-नामे

उडीद – અડદ (पु.)
कुळीथ – કળથી (स्त्री.)
गहू – ઘઉં (पु. ब. व.)
चणे, हरभरे – ચણા (पु. ब. व.)
जवस – અળશી(–સી) (स्त्री.)
ज्वारी, जोंधळा – જુવાર, જાર (स्त्री.)
तांदूळ – ચોખા (पु. ब. व.)
तीळ – તિલ, તલ (न.)
तूर – તુવ(–વે)ર (स्त्री.)
द्विदल धान्य – કઠોળ (न.)
डाळ – દાળ (स्त्री.)
नागली – નાગલી (स्त्री.)
बाजरी – બાજરી (स्त्री.)
भात (धान) – ડાંગર (स्त्री.)
भुईमूग – મગફળી (स्त्री.)
मका, मकई – મકાઈ (स्त्री.)
मसूर – મસુર (स्त्री.)
मूग – મગ (पु.)
वाटाणा – વટાણો (पु.)
कोंडा – થૂલું (न.)
गळिताचे धान्य – તેલદાણા (पु. ब. व.)

## काही अन्न-नामे

आमटी – (ખાટી) દાળ (स्त्री.)
कढी – કઢી (स्त्री.)
कोशिंबीर – કચુંબર, કચુમર (स्त्री., न.)
खीर – ખીર (स्त्री.)
गूळ – ગોળ (पु.)
चटणी – ચટણી (स्त्री.)
चपाती – ચપાટી(–તી) (स्त्री.)
चुरमुरे – મમરા (पु. ब. व.)
ताक – છાશ (न.)
तूप – ઘી (न.)
दही – દહીં (न.)
दूध – દૂધ (न.)
दूधपाक – દૂધપાક (पु.)
पाव – પાંઉ (पु. न.)
पोहे – પૌંઆ (पु. ब. व.)
पोळी – રોટલી (स्त्री.)
फोडणी – વઘાર (स्त्री.)
बासुंदी – બાસું(–સૂ)દી (स्त्री.)
बेसन लाडू – મગજનો લાડુ (पु.)
बिस्किट – બિસ્કી(–સ્કુ)ટ (स्त्री.)
भाकर(–री) – ભાખરી (स्त्री.), રોટલો (पु.)
भजी – ભજિયું (न.)
भाजी – ભાજી (स्त्री.), શાક (न.)
भात – ભાત (पु.)
रायते – રાયતું (न.)
लाही – ધાણી (स्त्री.)
लोणी – માખણ (न.)
वडा – વડો (पु.)
श्रीखंड – શ્રીખંડ, શિખંડ (पु.)
साखर – ખાંડ (स्त्री.)

## काही फळ-नामे

अननस – અન(-ને)નાસ (न.)
अंजीर – અંજીર (न.)
आंबा – કેરી (स्त्री.)
ऊस – શેરડી (स्त्री.)
कलिंगड – કલિંગડ(ું), તડબૂચ (न.)
कवठ – કોઠું (न.)
केळे – કેળું (न.)
चिकू – ચીકુ (न.)
जांभूळ – જાંબુ (न.)
डाळिंब – દાડમ (न.)
तुती – શેતૂર (न.)
द्राक्ष – દ્રાક્ષ (स्त्री.), દરાખ
नारळ – નારિયેલ, નાળિયેર (पु.)
नारिंग / संत्रे – નારંગી (स्त्री.)
पपनस – પપનસ (न.)
पपई – પપૈયું (न.)
पेरू – જમરૂખ, જામફળ (न.)
फणस – ફણસ (न.)
बोर – બોર (न.)
मोसंबे – મોસંબી (स्त्री.)
रातांबे – કોકમ (पु.)
सफरचंद – સફરજન (न.)
सिताफळ – સીતાફળ (न.)
सुपारी – સોપારી (स्त्री.)

## काही नाती-वाचक नामे

नवरा – વર, ધણી (पु.)
बायको – વહુ, બૈરી (स्त्री.)
आई – મા, બા (स्त्री.)
बाप – બાપ (पु.)
मूल – બાળક (न.)
काका – કાકો (पु.)
काकी (-कू) – કાકી (स्त्री.)
आजा, आजोबा – આજો (पु.)
आजी – આજી (स्त्री.)
मामा – મામા (पु.)
मामी – મામી (स्त्री.)
आत्या (मावळण) – ફોઈ (स्त्री.)
मावळा (आत्याचा नवरा) – ફૂઓ (पु.)
मुलगा – દીકરો (पु.)
मुलगी – દીકરી (स्त्री.)
पुतण्या – ભત્રીજો (पु.)
पुतणी – ભત્રીજી (स्त्री.)
भाचा – ભાણેજ (पु.)
भाची – ભાણેજી (स्त्री.)
भाऊ – ભાઈ (पु.)
बहीण – બહેન (स्त्री.)
चुलतभाऊ – પિતરાઈ ભાઈ
चुलतबहीण – પિતરાઈ બહેન
भावजय – ભોજાઈ (स्त्री.)
वहिनी – ભાભી (स्त्री.)
दीर (मोठा) – જેઠ (पु.)
दीर (धाकटा) – દિયર (स्त्री.)
जाऊ (मोठी) – જેઠાણી (स्त्री.)
जाऊ (धाकटी) – દેરાણી (स्त्री.)
सासू – સાસુ (स्त्री.)
सासरा – સસરો (पु.)
सून – વહુ (स्त्री.)
नणंद – નણંદ (स्त्री.)
मेहुणा (बहिणीचा नवरा) – બનેવી (पु.)
मेहुणा, साला (बायकोचा भाऊ) – સાળો (पु.)

मेहुणी (बायकोची बहीण) – સાળી (स्त्री.)
मामेभाऊ – મોળાઈ ભાઈ (पु.)
मामेबहीण – મોળાઈ બહેન (स्त्री.)
मावशी – માશી(-સી) (स्त्री.)
मावसभाऊ – મસિયાઈ ભાઈ (पु.)
मावसबहीण – મસિયાઈ બહેન (स्त्री.)
साडू – સાઢુ, સાઢુભાઈ (पु.)
वाडवडील – વડવાઓ (पु. ब. व.)
सगेसोयरे – સગાંવહાલાં (न. ब. व.)
वडील ('बाप'चे आदरार्थी नाम) – વડીલ, પિતાજી (पु. ब. व.)

## काही प्राणि-नामे

अजगर – અજગર (पु.)
अस्वल – રીંછ (न.)
आळी – ઇયળ (स्त्री.)
उंदीर – ઉંદર (पु.)
उंट – ઊંટ (पु.)
कबूतर – કબૂતર (न.)
काजवा – આગિયો (पु.)
कावळा – કાગડો (पु.)
कुत्रा, -त्री, -त्रे – કૂતરો, -રી, -રું
कोंबडा – કૂકડો (पु.)
कोकिळ – કોયલ (पु.)
कोळी – કરોળિયો (पु.)
कोल्हे – શિયાળ (न.)
खार – ખિસકોલી (स्त्री.)
खेचर – ખચ્ચર (न.)
गाढव – ગધેડું (न.)
गाय – ગાય (स्त्री.)
गोमलगाय – ગોકળગાય (स्त्री.)
घुबड – ઘુવડ (न. पु.)
घोडा – ઘોડો (पु.)
घोरपड – ઘો, પાટલો ઘો (पु.)
चिमणी – ચકલી (स्त्री.)
चित्ता – ચિત્તો (पु.)
जळू – જળો (पु.)
डास – મચ્છર (पु.)
डुक्कर – ડુક્કર (न.)
टोळ – તીડ (न.)
तट्टू – તટ્ટુ (न.)
पोपट – પોપટ (पु.)
पाल – ગરોળી (स्त्री.)
बगळा – બગલો (पु.)
बदक – બતક (न. स्त्री.)
चित्त्या वाघ – દીપડો (पु.)
बैल – બળદ (पु.)
बोका – બિલાડો (पु.)
भुंगा – ભમરો (पु.)
मधमाशी – મધમાખી (स्त्री.)
माशी – માખી (स्त्री.)
मांजर – બિલાડી (स्त्री.)
मुंगी – કીડી (स्त्री.)
मैना – મેના (स्त्री.)
मेंढा, -ढी, -ढरू – ઘેટો, -ટી, -ટું (स्त्री.)
मोर – મોર (पु.)
म्हैस – ભેસ (स्त्री.)
रेडा – પાડો (पु.)
लांडोर – ઢેલ, (-ડી) (स्त्री.)
वटवाघूळ – ચામાચીડિયું (न.)
वळू – આખલો (पु.)
वासरू – વાછરડો, -ડી. -ડું
वानर, माकड – વાંદરો (पु.)

वाघ – વાઘ (पु.)
वाळवी – ઊધઈ (स्त्री.)
विंचू – વીંછી (स्त्री.)
सरडा – સરડો, કાકિડો (पु.)
ससा – સસલું (न.)
साप – સાપ (पु.)
सुसर – મગર (पु.)
हत्ती – હાથી (पु.)
फुलपाखरू – પતંગિયું (न.)
सिंह – સિંહ (पु.)

## काही मसालापदार्थ-नामे

ओवा – અજમો (पु.)
कात – કાથો (पु.)
केशर – કેસર (न.)
खसखस – ખસખસ (स्त्री.)
जायफळ – જાયફળ (न.)
जिरे – જીરું
ज्येष्ठमध – જેઠીમધ (न.)
डिंक – ગુંદ, (–ર) (पु.)
तवकीर – તપખીર (स्त्री.)
दालचीनी – તજ (स्त्री. न.)
धणे – ધાણા (पु. ब. व.)
बडीशेप – વરિયાળી (स्त्री.)
मिरे – મરી (स्त्री.)
मोहरी – રાઈ (स्त्री.)
लवंग – લવિંગ (स्त्री.)
सुंठ – સૂંઠ (स्त्री.)
हळद – હળદર (स्त्री.)
हिंग – હિંગ (स्त्री.)

## गुजराती तिथि-नामे

('પડવો' खेरीज सर्व स्त्रीलिंगी)

प्रतिपद, पाडवा – પડવો (पु.)
द्वितीया, बीज – બીજ (स्त्री.)
तृतीया – તીજ (स्त्री.)
चतुर्थी – ચોથ (स्त्री.)
पंचमी – પાંચમ (स्त्री.)
षष्ठी – છઠ (स्त्री.)
सप्तमी – સાતમ (स्त्री.)
अष्टमी – આઠમ (स्त्री.)
नवमी – નોમ (स्त्री.)
दशमी – દશમ (स्त्री.)
एकादशी – અગિયારશ (स्त्री.)
द्वादशी – બારશ (स्त्री.)
त्रयोदशी – તેરસ (स्त्री.)
चतुर्दशी – ચૌદશ (स्त्री.)
पूर्णिमा – પૂનમ (स्त्री.)
अमावास्या – અમાસ (स्त्री.)

## गुजराती महिना-नामे

(गुजरातेत विक्रमसंवत् पाळला जातो. त्याचा प्रारंभ कार्तिक महिन्यापासून होतो.)

कार्तिक – કારતક
मार्गशीर्ष – માગશીર
पौष – પોષ (પોસ)
माघ – માહ (માઘ)

फाल्गुन – ફાગણ
चैत्र – ચૈત્ર
वैशाख – વૈશાખ
ज्येष्ठ – જેઠ
आषाढ – અષાડ
श्रावण – શ્રાવણ
भाद्रपद – ભાદરવો
आश्विन – આસો

## कांही वाद्य-नामे

वाजंत्री – વાજાં (न. ब. व.), વાજિંત્રો (पु. ब. व.)
(प. ब. व.)
खंजिरी – ખંજરી (स्त्री.)
झांज – ઝાંઝ (स्त्री.)
तबला – તબલું, નરઘું (न.)
तंबोरा – તંબૂરા (पु.)
तुतारी – તૂરી
ढोलके – ઢોલ
नगारा – નગારું
पिपाणी – પીપુડી
पावा – બાંસરી
मृदंग – મૃદંગ
शिंग – રણશિંગું
सनई – શરણાઇ
सतार – સીતાર
सरोद – સરોદ

## काही झाड-नामे

अडुळसा – અરડૂસો (पु.)
अशोक – આસો પાલવ (पु.)
आंबा – આંબો (पु.)
आवळा – આમળા (स्त्री.)
कडुलिंब – લીમડો (पु.)
करवंदी – કરમદો (पु.)
कवठी – કોઠું (न.)
कोकम – કોકમ (न.)
खैर – ખેર (न.)
चंदन – ચંદન, સુખડ (न.)
चाफा – ચંપો (पु.)
चिंच – આંબલી (स्त्री.)
जांभळी – જાંબૂડો (पु.)
ताग – શણ (न.)
ताड – તાડ (पु.)
देवदार – દેવદાર (पु.)
नारळी – નારિયેળી (स्त्री.)
पिंपळ – પીપલો (पु.)
पळस – ખાખરો (पु.)
पेरू – જામફળી (स्त्री.)
पोफळी – ફોફળી (स्त्री.)
फणस – ફણસી (स्त्री.)
फडे – થોર (पु.)
बकुळ – બકુલી (स्त्री.), બોરસલી
बाभळ – બાવળ, બાવળિયો (पु.)
बोर – બોરડી (स्त्री.)
बेहडा – બહેડો (पु.)
रिठा – અરીઠો (पु.)
वड – વડ (पु.)
साग – સાગ (पु.)
शिसवी – શીશમ (स्त्री.)
हिरडा – હરડી (स्त्री.)

## काही सामान्य नामे

अडकित्ता – સૂડી (स्त्री.)
अभ्र – વાદળું (न.)
आभाळ – આભ (न.)
आसू, अश्रू – આંસુ (न.)
ऐदाण – કોશ (स्त्री.), નરાજ (स्त्री.)
ओळ (लेखनातली) – લીટી (स्त्री.)
कणस – કણસલું, ડૂંડું (न.)
करवत – કરવત (स्त्री., न.)
काठी – લાકડી (स्त्री.)
कासार – કાંસાર (पु.)
कादंबरी – નવલકથા (स्त्री.)
कारागीर – કારીગર (पु.)
कुडते – કુડતું, પહેરણ (न.)
कुदळ – કોદાળી (स्त्री.)
कुन्हाड – કુહાડી (स्त्री.)
कुंडी – કૂંડું (न.)
खडा – કાંકરો (पु.)
खडाऊ – પાવડી, ચાખડી (स्त्री.)
खड्डा – ખાડો (पु.)
खत – ખાતર (न.)
खेडेगाव – ગામડું (न.)
खेळणे – રમકડું (न.)
खोड (झाडाचे) – થડ (न.)
खोड (व्यंग) – ખોડ (स्त्री.)
गल्ली – ફળિયું (न.), મહોલ્લો (पु.), શેરી (स्त्री.)
गवत – ઘાસ (न.)
गारुडी – જાદુગર (पु.)
गुराखी – રબારી (पु.)
गुरू – ઢોર (न.)
गोष्ट – વાર્તા, વાત (स्त्री.)
ग्राहक, गिन्हाईक – ઘરાક (न.)
घर – ઘર (न.)
घाम – પરસેવો (पु.)
चप्पल – ચંપલ (पु., स्त्री., न.)
चष्मा – ચશ્માં (न. ब. व.)
चहा – ચા (पु., स्त्री.)
चाबूक – ચાબખો, કોરડો (पु.)
चांभार – ચમાર (पु.)
चोच – ચાંચ (स्त्री.)
चीज – (१) ચીજ(-ઝ), વસ્તુ (स्त्री.)
(२) સાર્થકતા
छत्री – છત્રી (स्त्री.)
छप्पर – છાપરું (न.)
छिद्र – કાણું (न.)
जत्रा – મેળો (पु.)
जहाज – જહાજ (न.)
जबाब (उत्तर) – જવાબ (पु.)
जोडा – જોડો (पु.)
झरा – ઝરણું (न.)
झेंडा – ઝંડો (पु.), ધજા (स्त्री.)
झोका – હીંચકો (पु.)
टाक – કલમ (न.)
टोपली – ટોપલી, છાબ, (-ડી) (स्त्री.)
ठिपका – ટપકું (न.)
डहाळी – ડાળી (स्त्री.), ડાળું (न.)
डोंगर – ડુંગર(-રો) (पु.)
डोंबारी – બજાણિયો, નટ (पु.)
ढग – વાદળું (न.)
तंबाखू – તમાકુ (स्त्री.)
तपकीर – છીંકણી, સૂંઘણી (स्त्री.)
ताट (वाढलेले) – ભાણું (न.)
तास – કલાક (पु.)
तासणी (सुताराची) – વાંસલો (पु.)
थेंब – ટીપું (न.)
थैली – થેલી (स्त्री.)

दगड – પથ્થર (पु.)
दुकान – દુકાન (स्त्री.)
दागिना – ઘરેણું (न.)
दोरी – દોરી, દોરડું (न.), (-ડી) (स्त्री.)
दौत – ખડિયો (पु.)
नळ – નળ (पु.)
नांगर – હળ (पु.), સાંતીડું (न.)
नाव – નાવ (स्त्री.), વહાણ (न.)
नावाडी – નાવિક, સુકાની (पु.)
पक्षी – પંખી (न.)
पतंग – પતંગ, કનકવો (पु.)
पाऊस – વરસાદ (पु.)
पान – પાનું (न.)
पाकीट – પાકીટ (न.)
पाटी (लिहिण्याची) – પાટી (स्त्री.)
पापा – બચી (स्त्री.)
पायताण – પગરખું (न.)
पारंबी – વડવાઈ (स्त्री.)
पावडे – પાવડો (पु.)
पुस्तक – પુસ્તક (न.), ચોપડી (स्त्री.)
पोळे – મધપૂડો (पु.)
फडके – કપડું (न.)
फळा – પાટિયું (न.)
बर्फ – બરફ (न.)
बाई – બાઈ, બાઈડી (स्त्री.)
बाऊ – હાઉ, બહાઉ (पु.)
बाज – ખાટ, ખાટલો (पु.)
बातमी – વાર્તા, ખબર (स्त्री.)
बातमीपत्र – ખબરપત્ર (न.)
बीळ – દર (न.)
भाता – ધમણ (स्त्री.)
भोक – કાણું, છિદ્ર (न.)
मजूर – મજૂર (पु.)
माणूस – માણસ (स्त्री.)

मासा – માછલી (स्त्री.)
मुलगा, (-गी) – છોકરા (पु.), (-રી) (स्त्री.)
मूळ – મૂળ (न.)
रस्ता – રસ્તો (पु.)
रांग – હાર (स्त्री.)
रांगोळी – રંગોળી (स्त्री.), સાથિયા
रांजण – હાંડલું, હાંલ્લું (न.)
रात्र – રાત (पु. ब. व.)
रोपटे – છોડ (न.)
रोमांच, शहारा – રુવાંટું (न.)
लेहंगा – લેંઘો, સંઘણો (पु.)
वरात – વરઘોડો (पु.)
वर्तमानपत्र – છાપું (न.)
वल्हे – હલેસું (न.)
वाफ – વરાળ, બાફ (स्त्री.)
वारा – પવન (पु.), વા (पु.)
वास – ગંધ (पु., स्त्री.)
विजार – ઇજાર, સુરવાળ (स्त्री.)
विळा – દાતરડું (न.)
वीज – વીજળી (स्त्री.)
वेल – વેલ(-લી) (स्त्री.)
शर्यत – હરીફાઈ (स्त्री.)
शहर – શહેર (न.)
शिटी – સિસોટી, સીટી (स्त्री.)
शिंक – છીંક (स्त्री.)
शिंके – શીંકું (न.)
शीड – સઢ (पु.)
शीव – સીમ, સીમા (स्त्री.), સીમાડો (पु.)
शेत – ખેત, ખેતર (न.)
शेतकरी – ખેડૂત, કિસાન (पु.)
शेपूट – પૂંછ, (-છું) (न.)

सदरा – ખમીસ (पु.)
समुद्र – સમુદ્ર, દરિયો (पु.)
सकाळ – સવાર (स्त्री.)
संध्याकाळ – સાંજ(-ઝ) (स्त्री.)

हद्द – હદ, મર્યાદા (स्त्री.)
हातरुमाल – હાથરૂમાલ (पु.)
हार (गळ्यात घालण्याचा) – હાર (पु.)
हौद – હોજ (पु.)

*

# प्रकरण ७ : क्रियापद विचार

१. आता आपण क्रियापदे कशी बनवायची ते पाहू. वाक्य बनवण्याकरिता क्रियापद आवश्यक असते हे आपल्याला माहीत आहे. किमान कर्ता आणि क्रियापद असले की वाक्य पूर्ण होते.

२. मराठीत क्रियेचे मूळरूप 'चढणे', 'धावणे', 'बसणे' अशा 'णे' प्रत्यय अंती असलेल्या शब्दाने दाखविले जाते. गुजरातीत हा प्रत्यय 'वुं' लावतात. उदा०, 'चडवुं', 'दोडवुं' 'बेसवुं' इ. हे त्या क्रियाशब्दाचे मूळरूप होय, आणि 'णे' (मराठी) व 'वुं' (गुजराती) काढून जे रूप राहते तो त्याचा धातू होय. म्हणजे 'चड', 'दोड', 'बेस' हे धातू होत.

३. वर मराठीच्या ज्या क्रियांचे धातू म्हणून दिले आहेत ते म्हणजे त्या क्रियांचा एकवचनी आज्ञार्थही बनतो हे, धातू वाचले असता, आपल्या चटकन लक्षात येते. तीच गत गुजराती क्रियाशब्दांच्या धातंचीही आहे. 'બેસ' (बस) 'દોડ' (धाव), જમ (जेव), 'ખા' (खा) या एकवचनी आज्ञाही होतात. तेव्हा एकवचनी आज्ञार्थ करायचा म्हणजे क्रियापदाचा धातू वापरायचा हे जाता जाता आपल्या लक्षात आले. असो.

४. क्रियापद हे जसे क्रिया काय ते दाखविते तसाच काळही दाखविते. 'बाळू जेवतो' यातील 'जेवतो' या क्रियापदाने जेवण्याची क्रियाही दर्शविली आणि त्या क्रियेचा काळही दर्शविला. आणि तिसरीही एक गोष्ट दर्शविली, ती म्हणजे ती क्रिया करणारा म्हणजे 'कर्ता' एक आहे की अनेक आहेत, हे म्हणजे वचनही दर्शविले. याकरिता क्रियापद कसे बनवायचे हे सांगताना (१) कोणत्या काळाचे, व (२) कोणत्या वचनाचे, ते बनवायचे हेही सांगणे आवश्यक आहे.

५. प्रथम आपण वर्तमानकाळाचीच एकवचनी व बहुवचनी क्रियापदांची रूपे कशी बनवायची ते पाहू. ते पाहताना क्रियापदांच्या दोन मुख्य जाती लक्षात घेतल्या पाहिजेत : (१) **क्रियादर्शक** क्रियाशब्द; उदा० દોડવું, બનવું (बनणे), ગાવું (गाणे), મરવું (मरणे), થવું (होणे) इ.; आणि (२) **स्थितिवाचक** क्रियाशब्द; तो एकच आहे : હોવું (असणे). 'હોવું' हा स्थितिवाचक क्रियाशब्द एकच असला तरी त्याची सत्ता मोठी आहे. गुजरातीत वर्तमानकाळी क्रियापद

बनविताना त्याची मदत अपरिहार्यच असते. म्हणून त्याची वर्तमानकाळाची रूपे अगोदर आपण लक्षात घेऊ. ती पुढीलप्रमाणे :

एकवचनी : 'છે'; बहुवचनी : 'છે'.

'રસ્તો છે' (रस्ता आहे), 'ગામડું છે' (गाव आहे), 'ચાર વસ્તુઓ છે' (चार वस्तू आहेत)—अशी वर्तमानकाळी वाक्ये बनतात.

हे झाले 'હોવું' या क्रियाशब्दासंबंधी : इतर क्रियाशब्दांची रूपे कशी बनतात ? त्यांच्या धातूंना 'ए' प्रत्यय लावायचा व त्यांच्यापुढे 'છે' हे क्रियापद ठेवायचे की त्या क्रियेचे सर्वलिंगी **वर्तमानकाळी** एकवचनी व बहुवचनी क्रियापद बनते.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| उदा०, | કરવું | (करणे) | : કરે છે | (करतो, करते किंवा करतात) |
| | ડરવું | (भिणे) | : ડરે છે | (भितो, भिते किंवा भितात) |
| | પીવું | (पिणे) | : પીએ છે | (पितो, पिते किंवा पितात) |
| | સૂવું | (झोपणे) | : સૂએ છે | (झोपतो........) |
| | ચાલવું | (चालणे) | : ચાલે છે | (चालतो........) |

६. येथे, काही विशिष्ट धातूंची विशिष्ट रीतीने जी रूपे बनतात ती लक्षात घेतली पाहिजेत :

(१) 'आ'कारान्त धातूचे 'એ' प्रत्ययाचे 'ય' रूप बनते; जसे, **ખાય છે** (खातो), **ગાય છે** (गातो), **ધાય છે** (धावतो), **પાય છે** (पाजतो) इ.

(२) 'જવું' (जाणे), 'થવું' (होणे) या क्रियाशब्दांचे धातू 'જ' व 'થ' असे न बनता 'જા' व 'થા असे बनतात आणि मग वरील (१) प्रमाणे 'જાય છે', 'થાય છે' अशी त्यांची क्रियापदे होतात.

(३) 'હોવું' (असणे) या धातूचे रूप अगदी स्वतंत्र–'છે'–असे बनते, तसेच 'હોય છે' असेही एक रूप बनते, पण त्याने 'असणे' या क्रियेचे सातत्य दाखविले जाते; त्याचा अर्थ 'असतो, असतात' असा होतो, म्हणजे रीति-वर्तमानकाळ होतो.

७. क्रियापदांचे प्रकार दोन : (१) सकर्मक, व (२) अकर्मक. ज्या क्रियापदाला 'काय' (શું) म्हणून प्रश्न विचारला असता उत्तर मिळते ते 'सकर्मक' क्रियापद व उत्तर मिळत नाही ते 'अकर्मक' क्रियापद हे आपल्याला ठोकळ मानानें माहीतच आहे.

८. अकर्मक आणि सकर्मक क्रियापदांची वैशिष्टये कोणती ?

अकर्मक क्रियापदावर सत्ता फक्त कर्त्याचीच चालते; म्हणजे कर्त्याचे जे लिंग व वचन असेल तेच क्रियापदाचे असते.

सकर्मक क्रियापदाच्या बाबतीत क्रियापदावर कर्माची छाप असते, व वर्तमानकाळी जरी क्रियापद कर्त्याच्याच लिंग-वचनानुसार चालते तरी भूतकाळी व विध्यर्थ असताना ते कर्माच्या लिंग-वचनानुसार चालते. उदा० 'રમાએ કાગળ વાંચ્યો' (रमाने पत्र वाचले) (भूतकाळ), **'રમાએ કાગળ વાંચવો'** (रमाने पत्र वाचावे) (विध्यर्थ), हे इतर काळ व क्रियापदाची अर्थानुसारी रूपे आपल्याला पुढे पाहायची आहेत. आता फक्त क्रियापदांचे सकर्मक म्हणून काय वैशिष्टय तेवढे सांगण्यापुरतीच ही उदाहरणे घेतली.

विभक्ति-विचारात नाम हे द्वितीया विभक्तीत कर्म असताना प्रत्यय विरहित (म्हणजे मूळ जसेच्या तसे) असते तसे स-प्रत्ययही असते व त्याला '**ने**' हा प्रत्यय लागतो हे आपण पाहिले आहे. अर्थात हे '**ने**' प्रत्यय लागून होणारे नाम त्या क्रियापदाचे गौण कर्म असते. अशी दोन्ही कर्मे अथवा एक कर्म असणारी सकर्मक क्रियापदांची वाक्ये उदाहरणादाखल पुढे दिली आहेत :

१ જેઠાભાઈ **ભિખારીને** અનાજ આપે છે.
२ ગોવાળીયો **ગાયને** ઘાસ નાંખે છે (टाकतो).
३ રાજા કર લે છે (घेतो).
४ લોકો કામ કરે છે.
५ અમૃતલાલ કાગળ લખે છે.
६ બાઈ પાણી પીએ છે.
७ ધોબી કપડાં ધુએ છે.
८ શિક્ષક **વિદ્યાર્થીઓને** સંસ્કૃત શીખવે છે.
९ મા **બચ્ચાને** વાર્તા (गोष्ट) કહે છે.
१० કનુ દુકાનથી ચોપડી (पुस्तक) લાવે છે (आणतो).

वरील उदाहरणांवरून दिसून येते की सामान्यतः प्रधान कर्म निर्जीव वस्तु सूचित करते तर गौण कर्म सजीव वस्तू दर्शविते.

अकर्मक व सकर्मक क्रियापदांविषयी तूर्त एवढी माहिती पुरेशी आहे.

*

# प्रकरण ८ : क्रियाशब्दसंग्रह

अभ्यासाला मदत म्हणून पुढे काही क्रियाशब्द देत आहे; कंसात ते 'सकर्मक' की 'अकर्मक' हे (स. क्रि.) व (अ. क्रि.) असे लिहून दर्शविले आहे :

### अ

अडकणे – ફસવું (अ. क्रि.)
अडकविणे – અટકાવવું (स. क्रि.)
अडखळणे – લથડવું (अ. क्रि.)
अडणे – અટકવું, થોભવું (अ. क्रि.)
अडविणे – અટકાવવું, રોકવું (स. क्रि.)
अनुसरणे – અનુસરવું, રોકવું (स. क्रि.)
अंथरणे – પાથરવું (स. क्रि.)
असणे – હોવું (अ. क्रि.)

### आ

आकर्षणे – આકર્ષવું, ખેંચવું (स. क्रि.)
आकसणे – ટૂંકાવું (अ. क्रि.)
आखुडणे – સંકોચાવું (अ. क्रि.)
आंघोळ करणे – નાહવું (अ. क्रि.)
आंघोळ घालणे – નવડાવવું (स. क्रि.)
आटणे – સુકાવું (अ. क्रि.)
आटोपणे – આટોપવું (स. क्रि.)
आढळणे – દેખાવું, જણાવું (अ. क्रि.)
आणणे – લાવવું (स. क्रि.)
आपटणे – અફાળવું (स. क्रि.)
आरवणे (कोंबडा) – રવવું, કૂકડી કૂક કરવું (अ. क्रि.)
आंबविणे – આથવું, અંબોળવું (स. क्रि.)
आरडणे (गुराचे) – આરડવું (अ. क्रि.)
आवडणे – ગમવું, રુચવું (स. क्रि.)
आवरणे – સમેટવું, સંકેલવું (स. क्रि.)
आवळणे – કસવું (स. क्रि.)

### इ

इच्छिणे – ઇચ્છવું (स. क्रि.)

### उ

उकडणे – બાફવું (स. क्रि.)
उकडणे (उन्हाने इ.) – કઢવું (अ. क्रि.)
उकलणे – ઉકેલવું (स. क्रि.)
उकळणे (पाणी इ.) – ઉકળવું (अ. क्रि.)
उकळविणे – ઉકાળવું (स. क्रि.)
उखडणे – ઉખા(–ખે)ડવું (स. क्रि.)
उगवणे (सूर्य इ.) – ઊગવું (अ. क्रि.)
उगवणे (रोप इ.) – ઊગવું, વધવું (अ. क्रि.)
उगारणे – ઉગામવું (स. क्रि)
उगाळणे (सहाणेवर) – ઘસોટવું (स. क्रि.)
उघडणे (शाळा, माम्य इ.) – ઊઘડવું, ખૂલવું (अ. क्रि.)
उघडणे (दार इ.) – ઉઘાડવું, ખોલવું (स. क्रि.)
उचलणे – ઊંચકવું, ઉઠાવવું (स. क्रि.)
उच्चारणे – ઉચ્ચારવું (स. क्रि.)
उजविणे – ઊજવવું, શણગારવું (स. क्रि.)
उजळणे (भांडी इ.) – માંજવું, ઊટકવું (स. क्रि.)
उजाडणे – ઉજાસવું (अ. क्रि.)
उठणे – ઊઠવું (अ. क्रि.)
उठविणे – ઉઠાડવું (स. क्रि.)

उठविणे (जागे करणे) – જગાડવું (स. क्रि.)
उडविणे (पतंग) – ચગાવવું (स. क्रि.), ઉડાડવું
उडणे – ઊડવું (अ. क्रि.)
उडी मारणे – કૂદવું (अ. क्रि.)
उतरणे – ઊતરવું (अ. क्रि.)
उतरणे (लेख इ.) – ઉતારવું (स. क्रि.)
उधळणे (फुले इ.) – ઉછાળવું (स. क्रि.)
उधळणे (व्यर्थ) – ઉડાવવું (स. क्रि.)
उपजणे – ઊપજવું, પેદા થવું (अ. क्रि.)
उपटणे – ઊખેડવું (स. क्रि.)
उभे राहणे – ઊભવું (अ. क्रि.)
उफाळणे – ઊભરાવું (अ. क्रि.)
उलथणे – ઉથલાવવું (स. क्रि.)
उमजणे – સમજવું (स. क्रि.)
उसळणे – ઊછળવું (अ. क्रि.)

## ऐ

ऐकणे – સાંભળવું (स. क्रि.)
ऐकविणे – સંભળાવવું (स. क्रि.)

## ओ

ओघळणे – ઓગળવું (अ. क्रि.)
ओढणे – ખેંચવું (स. क्रि.)
ओतणे – રેડવું (स. क्रि.)
ओतणे (धातूचा रस) – ઓતવું (स. क्रि.)
ओरबाडणे – ઓરપવું (स. क्रि.)
ओलांडणे – ઓળંગવું (स. क्रि.)
ओवणे – પરોવવું (स. क्रि.)
ओवाळणे – ઓવાળવું (स. क्रि.)
ओसरणे – ઓસરવું (अ. क्रि.)
ओसंडणे – ઊભરાવું (अ. क्रि.)
ओळखणे – ઓળખવું (स. क्रि.)

## क

कढविणे – કઢવું (स. क्रि.)
कमावणे – કમાવું (स. क्रि.)
करणे – કરવું (स. क्रि.)
कसणे – તાવવું (स. क्रि.)
केर काढणे – વાળવું (स. क्रि.)
काढणे – કાઢવું (स. क्रि.)
(रेघ) काढणे – (લીટી) દોરવી (स. क्रि.)
कांडणे – ખાંડવું (स. क्रि.)
कांतणे – કાંતવું (स. क्रि.)
कातरणे – કાતરવું (स. क्रि.)
कापणे (करवतीने) – વહેરવું (स. क्रि.)
कापणे – કાપવું (स. क्रि.)
कापणे (पीक) – લણવું (स. क्रि.)
कालवणे – કાલવવું (स. क्रि.)
कोमेजणे – કરમાવું (अ. क्रि.)
कोरणे – કોતરવું (स. क्रि.)
कोसळणे – પડી ભાગવું, બેસી જવું (अ. क्रि.)

## ख

खणणे – ખોદવું (स. क्रि.)
खरडणे – ઘસડવું (अ. क्रि.)
खरीदणे – ખરીદવું (स. क्रि.)
खर्चणे – ખરચવું (स. क्रि.)
खाऊ घालणे – ખવડાવવું (स. क्रि.)
खाणे – ખાવું (स. क्रि.)
खुलणे – ખીલવું (अ. क्रि.)
खेळणे – રમવું (अ. क्रि.)
खेळविणे – રમાડવું (स. क्रि.)
खोचणे – ઘાલવું, ખોસવું (स. क्रि.)
खोडणे – છેકવું (स. क्रि.)

### ग

गणणे – ગણવું (स. क्रि.)
गाठणे – આંબવું (स. क्रि.)
गाणे – ગાવું (स. व अ. क्रि.)
गाळणे – ગાળવું (स. क्रि.)
गिळणे – ગળવું (स. क्रि.)
गुंतणे – ફસાવું (अ. क्रि.)
गुंडाळणे – વીંટાળવું (स. क्रि.)
गोवणे – સંડોવવું (स. क्रि.)
गोंधळणे – અમુંઝાવું (अ. क्रि.)
गोळा करणे – ભેગું કરવું (स. क्रि.)

### घ

घसरणे – લપસવું (अ. क्रि.)
घडविणे – ઘડવું (स. क्रि.)
घडणे – બનવું (अ. क्रि.)
घालणे (अंगात) – પહેરવું (स. क्रि.)
घालणे (पाणी) – આપવું (स. क्रि.)
घासणे – ઘસવું, માંજવું (स. क्रि.)
घाबरणे – અકળાવું, ગભરાવું (अ. क्रि.)
घाबरविणे – ગભરાવવું (स. क्रि.)
घुसडणे – ઘુસાડવું (स. क्रि.)
घुसणे – ઘૂસવું (अ. क्रि.)
ધસવું (अ. क्रि.)
घेणे – લેવું (स. क्रि.)
घेरणे – ઘેરવું (स. क्रि.)
घोकणे – ગોખવું (स. क्रि.)
घोरणे – ઘોરવું (अ. क्रि.)

### च

चकाकणे – ચળકવું (अ. क्रि.)
चढणे – ચડ(–ઢ)વું (अ. क्रि.)
चढविणे – (१) ચડા(–ઢા)વવું (स. क्रि.)
(२) ઉચકાવવું (स. क्रि.)
चमकणे – ચળકવું (अ. क्रि.)
चमकणे (चकित होणे) – ચોંકવું (अ. क्रि.)
चमचमणे – ઝબૂકવું (अ. क्रि.)
चरणे – ચરવું (अ. क्रि.)
चळणे – ડગવું (अ. क्रि.)
चाटणे – ચાટવું (स. क्रि.)
चारणे – ચારવું (स. क्रि.)
चालणे – ચાલવું (अ. क्रि.)
चावणे – ચાવવું (स. क्रि.)
चावणे (कुत्रे इ.) – કરડવું (अ. क्रि.)
चाळणे (पीठ इ.) – ચાળવું (स. क्रि.)
चिकटणे – ચોંટવું (अ. क्रि.)
चिकटविणे – ચોંટાડવું (स. क्रि.)
चिडणे – ચિડાવું (अ. क्रि.)
चिडविणे – ચીડવવું (स. क्रि.)
चितारणे – ચીતરવું (स. क्रि.)
चिरडणे – કચડવું (स. क्रि.)
चिरणे – ચીરવું (स. क्रि.)
चुकणे – ચૂકવું, ભૂલવું (अ. क्रि.)
चुकणे (गाडी इ.) – ખોવું (स. क्रि.)
चुकविणे – ચુકાવવું (स. क्रि.)
चोरणे – ચોરવું (स. क्रि.)
चोळणे – ચોળવું (स. क्रि.)

### छ

छपणे – છૂપવું (अ. क्रि.)
छपविणे – છુપાવવું (स. क्रि.)
छापणे – છાપવું (स. क्रि.)
छाटणे – છાંટવું (स. क्रि.)

### ज

जगणे – જીવવું (अ. क्रि.)
जगविणे – જિવાડવું (स. क्रि.)
जडविणे – જોડવું, ખીલવું (स. क्रि.)

जपणे – સંભાળવું (स. क्रि.)
जन्मणे – જન્મવું (अ. क्रि.)
जळणे – બળવું (अ. क्रि.)
जाळणे – બાળવું (स. क्रि.)
जागणे – જાગવું (अ. क्रि.)
जाचणे – ખૂંચવું (अ. क्रि.)
जाचणे (छळणे) – પીડવું (स. क्रि.)
जाणे – જવું (अ. क्रि.)
जाणणे – જાણવું (स. क्रि.)
जिंकणे – જીતવું (स. क्रि.)
जिरविणे – જીરવવું (स. क्रि.)
जेवणे – જમવું (स. व अ. क्रि.)
जोडणे – જોડવું (स. क्रि.)

## झ

झगडणे – ઝઘડવું (अ. क्रि.)
झटकणे (वस्त्र) – ઝાટકવું (स. क्रि.)
झटकणे (धुरळा इ.) – ઝાપટવું (स. क्रि.)
झपाटणे – ઝપાટવું (अ. क्रि.)
झाकणे – ઢાંકવું (स. क्रि.)
झाडणे – ઝાડવું (स. क्रि.)
झिजणे – ઘસાઈ જવું (अ. क्रि.)
झोपणे – સૂવું (अ. क्रि.)
झोपविणे – સુવાડવું (स. क्रि.)

## ट

टाकणे – તજવું (स. क्रि.)
टाकणे (फेकणे) – નાંખવું (स. क्रि.)
टाळणे – ટાળવું (स. क्रि.)
टिपणे (दाणा) – ચૂંટવું (स. क्रि.)
टिकणे – ટકવું (अ. क्रि.)
टेकणे – ઓઠંગવું (अ. क्रि.)
टोचणे – ઘોંચવું (स. क्रि.)

## ठ

ठकविणे – છેતરવું (स. क्रि.)
ठरणे – ઠરવું (अ. क्रि.)
ठरविणे (कार्यक्रम इ.) – ગોઠવવું (स. क्रि.)
ठरविणे – ઠરાવવું, નક્કી કરવું
ठिबकणे – ટપકવું (अ. क्रि.)
ठेवणे – મૂકવું (स. क्रि.)
ठोकणे – ઠોકવું (स. क्रि.)
ठोठावणे – ઠોકવું (स. क्रि.)

## ड

डचमळणे – છલકાવું (अ. क्रि.)
डगमगणे – ડગમગવું (अ. क्रि.)
डसणे – ચોંટવું, વળગવું (अ. क्रि.)
डुलणे, डोलणे – ઝૂલવું (अ. क्रि.)

## ढ

ढकलणे – ધકેલવું (स. क्रि.)
ढवळणे – ઘૂમરડવું (स. क्रि.)
हલાવવું (स. क्रि.)

## त

तडकणे – ફાટવું (अ. क्रि.)
तरणे – તરવું (अ. क्रि.)
तपासणे – તપાસવું (स. क्रि.)
तळणे – તળવું (स. क्रि.)
ताणणे – તાણવું (स. क्रि.)
तारणे – તારવું (स. क्रि.)
तासणे – તાછ(–સ)વું (स. क्रि.)
तापणे – તપવું (अ. क्रि.)
तापविणे – તપાવવું (स. क्रि.)
तुडविणे – ખૂંદવું (स. क्रि.)

तोलणे – તોળવું (स. क्रि.)
तोडणे (फूल इ.) – ચૂંટવું (स. क्रि.), તોડવું, ટૂંપવું

### थ

थकणे – થાકવું (अ. क्रि.)
थरथर कापणे – ધ્રૂજવું (अ. क्रि.)
थांबणे – થોભવું (अ. क्रि.), રોકાવું
थांबविणे – રોકવું (स. क्रि.)
थुंकणे – થૂંકવું (अ. क्रि.)
थोपविणे – અટકાવવું (स. क्रि.)
थोपटणे – થાબડવું (स. क्रि.)

### द

दडणे – લપાવું (अ. क्रि.)
दडविणे – સંતાડવું (स. क्रि.)
दडपणे – દબાવવું (स. क्रि.)
दळणे – દળવું (स. क्रि.)
दाबणे – દાબવું (स. क्रि.)
दाखविणे – બતાવવું (स. क्रि.)
दिपणे – અંજાવું (अ. क्रि.)
दिपवणे – આંજવું (स. क्रि.)
दिसणे – દીસવું, ભાસવું (अ. क्रि.)
दुखणे – દુખવું (अ. क्रि.)
दुखवणे – દુખાવવું (स. क्रि.)
देणे – આપવું (स. क्रि )

### ध

धरणे – પકડવું (स. क्रि.)
धावणे – દોડવું (अ. क्रि.)
धिक्कारणे – ધિક્કારવું (स. क्रि.)
धुणे – ધોવું (स. क्रि.)
धुडकावणे – ધુડકાવવું (स. क्रि.)

### न

नटविणे – શણગારવું (स. क्रि.)
नमणे – નમવું (स. क्रि.)
नडणे – અડવું (स. क्रि.)
नाचणे – નાચવું (अ. क्रि.)
नांगरणे – ખેડવું (स. क्रि.)
नाडणे – ઠગવું (स. क्रि.)
नाकारणे – નકારવું, ના પાડવી (स. क्रि.)
नासणे – બગડવું (अ. क्रि.)
नाही, नाहीत – નથી
निजणे – સૂવું (अ. क्रि.)
निजवणे – સુવાડવું (स. क्रि.)
निघणे – નીકળવું, ઊપડવું (अ. क्रि.)
निंदणे (तण) – નીંદવું (स. क्रि.)
निरखणे – નીરખવું (स. क्रि.)
निर्मिणे – સર્જવું (स. क्रि.)
निभणे – ટકવું, નભવું (अ. क्रि.)
निभावणे – નભાવવું (स. क्रि.)
निवडणे – ચૂંટવું (स. क्रि.)
नेणे – લઈ જવું (स. क्रि.)

### प

पकडणे – પકડવું (स. क्रि.)
पचणे – પચવું (अ. क्रि.)
पचविणे – પચાવવું (स. क्रि.)
पटणे – સમજવું (स. क्रि.)
पटविणे – સમજાવવું (स. क्रि.)
पडणे – પડવું (अ. क्रि.)
परवडणे – પરવડવું, પાલવવું (अ. क्रि.)
पसरविणे – વેરવવું (स. क्रि.)
– ફેલાવવું (स. क्रि.)
पाणी घालणे – પાણી પાવું
पसरणे – ફેલાવું (अ. क्रि.)
पळणे – નાસવું, ભાગવું (अ. क्रि.)

पाठविणे – મોકલવું (स. क्रि.)
परवडणे – ઝાટકવું (स. क्रि.), સોવું (स. क्रि.)
पाडणे – પાડવું (स. क्रि.)
पाघळणे – ઓગળવું (अ. क्रि.)
पाळणे – પાળવું (स. क्रि.)
पाहणे – જોવું (स. क्रि.)
पिकणे – પાકવું (अ. क्रि.)
पिकविणे (फळ) – પકવવું (स. क्रि.)
(धान्य इ.) – નિપજાવવું (स. क्रि.)
पिळणे – આમળવું (स. क्रि.)
મચડવું (स. क्रि.)
पुरणे (मळ इ.) – દાટવું
पुसणे (लिहिलेले) – ભૂંસવું (स. क्रि.)
पुसणे (हात इ.) – લૂછવું (स. क्रि.)
पुरविणे (माल इ.) – પૂરવું (स. क्रि.)
पेरणे – વાવવું (स. क्रि.)
पोचणे – પહોંચવું (अ. क्रि.)
पोळणे – બળવું (अ. क्रि.)
पोहणे – તરવું (अ. क्रि.)

## फ

फसणे – ઠગાવું (अ. क्रि.), ધુતાવું
फसविणे – ઠગવું, છેતરવું (स. क्रि.)
फोडणे – ફાડવું (स. क्रि.)
फिरणे – ઘૂમવું (अ. क्रि.)
फिरवणे – ઘુમાવવું, ફેરવવું (स. क्रि.)
फुंकणे – ફૂંકવું (स. क्रि.)
फिटणे (कर्ज इ.) – અદા–ચૂકતે–થવું (अ. क्रि.)
फुटणे – ભાંગવું (अ. क्रि.)
फुलणे – ખીલવું (अ. क्रि.)
फेकणे – ફેંકવું (स. क्रि.)
फेडणे (कर्ज इ.) – અદા કરવું (स. क्रि.)
फोडणे – ફોડવું (स. क्रि)

## ब

बचावणे – બચાવવું (स. क्रि.)
बजावणे (कामगिरी इ.) – બજાવવું (स. क्रि.)
बडविणे – પીટવું (स. क्रि.)
बनणे – બનવું (अ. क्रि.)
बनविणे – બનાવવું (स. क्रि.)
बडबडणे – બડબડવું (स. क्रि.)
बदलणे – { બદલવું (स. क्रि.) / બદલાવું (अ. क्रि.) }
बसणे – બેસવું (अ. क्रि.)
बसविणे – બેસાડવું (स. क्रि.)
बहकणे – બહેકવું (अ. क्रि.)
बांधणे – બાંધવું (स. क्रि.)
बिघडणे – બગડવું (अ. क्रि.)
बिघडविणे – બગાડવું (स. क्रि.)
बुडणे – ડૂબવું (अ. क्रि.)
बुडविणे – ડુબાવવું (स. क्रि.)
बोलणे – બોલવું (स. क्रि.)
बोलावणे – બોલાવવું (स. क्रि.)
बोचणे – ખૂંચવું (अ. क्रि.)

## भ

भजणे – ભજવું (स. क्रि.)
भटकणे – રખડવું, ભટકવું (अ. क्रि.)
भरणे – ભરવું, પૂરવું (स. क्रि.)
भडकणे – ભડકવું (अ. क्रि.)
भडकविणे – ઉશ્કેરવું (स. क्रि.)
भाकणे – ભાખવું (स. क्रि.)
भाजणे (अंग इ.) – દાઝવું (अ. क्रि.)
भाजणे (भाकरी इ.) – { શેકવું (स. क्रि.) / ભૂંજવું (स.क्रि.) }
भांडणे – લડવું (स. क्रि.)
भिडणे – ભીડવું (अ. क्रि.), ઝૂઝવું

भिजणे – ભીજવું (अ. क्रि.)
भिजविणे – ભીજવવું (स. क्रि.)
भिणे – બીવું, ડરવું (अ. क्रि.)
भुलविणे – ભોળવવું (स. क्रि.)
भुलणे – ભરમાવું (अ. क्रि.)
भुंकणे – ભસવું (अ. क्रि.)
भेटणे – મળવું (स. क्रि.)
भोगणे – ભોગવું (स. क्रि.)
भोसकणे – ભોંકવું, ઘોંચવું (स. क्रि.)
भेडसावणे – બિવડાવવું (स. क्रि.)

## म

मढविणे – મઢવું (स. क्रि.)
मरणे – મરવું (अ. क्रि.)
मळणे (कणसे) – મસળવું (स. क्रि.)
मागणे – માગવું (स. क्रि.)
मागविणे – મગાવવું (स. क्रि.)
माजणे } – માતવું (अ. क्रि.)
मातणे }
मानणे – માનવું (स. क्रि.)
मांडणे (टिपणे) – માંડવું (स. क्रि.)
मांडणे (रूजू करणे) – ઓડવું (स. क्रि.)
मापणे – માપવું (स. क्रि.)
मारणे – મારવું (स. क्रि.)
मावणे – માવું (अ. क्रि.)
मिटणे (पापणी इ.) – મીચવું (स. क्रि.)
मिसळणे – ભેળવવું (स. क्रि.)
मिळविणे (बेरीज) – ઉમેરવું (स. क्रि.)
मिळविणे (प्राप्ति) – કમાવું (स. क्रि.)
मिळविणे – મેળવવું (स. क्रि.)
मिळणे – મળવું (अ. क्रि.)
मुकणे – ગુમાવવું (स. क्रि.)
मुजणे (खड्डा इ.) – ભરાવું (स. क्रि.)
मुजविणे – ભરવું (स. क्रि.)
मोजणे (माप इ.) – માપવું (स. क्रि.)
मोजणे (अंक इ.) – ગણવું (स. क्रि.)
मोडणे – ભાંગવું (स. व अ. क्रि.)

## य

येणे – આવવું (अ. क्रि.)
येणे (अवगत असणे) – આવડવું (अ. क्रि.)
योजणे – યોજવું (स. क्रि.)

## र

रगडणे – રગડવું (स. क्रि.)
रखडणे – રખડવું, ભટકવું (अ. क्रि.)
रडणे – રોવું (अ. क्रि.)
रचणे – રચવું (स. क्रि.)
रमणे – રમવું (अ. क्रि.)
राखणे – રાખવું (स. क्रि.)
रागावणे – ગુસ્સે થવું (अ. क्रि.)
रांधणे – રાંધવું (स. क्रि.)
राहणे – રહેવું, વસવું (अ. क्रि.)
रिझणे – રીઝવું (अ. क्रि.)
रिझविणे – રીઝવવું (स. क्रि.)
रुचणे – ગમવું (स. क्रि.)
रुझणे – રૂઝાવું (अ. क्रि.)
रुसणे – રિસાવું (अ. क्रि.)
रोकणे – રોકવું, અટકાવવું (स. क्रि.)

## ल

लंगडणे – લંગડાવું (स. क्रि.)
लटकणे – લટકવું, ટંગાવું (स. क्रि.)
लटपटणे – અફળાવું (अ. क्रि.), લથડવું
लागणे (मनाला) – લાગવું (स. क्रि.)
लागणे (इजा होणे) – વાગવું (अ. क्रि.)
लाजणे – શરમાવું (अ. क्रि.)

लाजविणे – શરમાવવું (स. क्रि.)
लांबणे – લંબાવું (अ. क्रि.)
लांबविणे – લંબાવવું (स. क्रि.)
लाटणे (पोळी) – વણવું (स. क्रि.)
लिहिणे – લખવું (स. क्रि.)
लुटणे – લૂંટવું (स. क्रि.)
लेणे (पेहेरणे) – પહેરવું (स. क्रि.)
लोटणे – ધકેલવું (स. क्रि.)
लोंबणे – લટકવું, ટંગાવું (अ. क्रि.)

व

वरणे – વરવું (स. क्रि)
वसणे – વસવું (अ. क्रि.)
वसविणे – વસાવવું (स. क्रि.)
वाकणे – નમવું, વળવું (अ. क्रि.)
वागणे – વર્તવું (अ. क्रि.)
वाखाणणे – વખાણવું (स. क्रि.)
वाचणे – વાંચવું (स. क्रि.)
वाजणे – વાગવું (अ. क्रि.)
वाजविणे – વગાડવું (स. क्रि.)
वाटणे (मनाला) – લાગવું (स. क्रि.) / ધારવું
वाटणे (पाट्यावर) – વાટવું (अ. क्रि.) ઘૂંટવું
वाटणे (विभागणे) – વાટવું, વહેંચવું (स. क्रि.)
वाढणे (मोठे होणे) – ઊછરવું (अ. क्रि.)
वाढणे – પીરસવું (स. क्रि.)
वाढविणे – વધારવું (स. क्रि.)
वाढविणे (मूल इ.) – ઉછેરવું (स. क्रि.)
वाहणे (भार) – વહેવું (स. क्रि.)
वाहणे (पाणी इ.) – વહેવું (अ. क्रि.)
वाळणे – 'सुकणे' पाहा.
वापरणे – વાપરવું (स. क्रि.)

विकणे – વેચવું (स. क्रि.)
विकत घेणे – ખરીદવું (स. क्रि.)
विखुरणे – વિખેરવું (स. क्रि.)
विचारणे – પૂછવું (स. क्रि.)
विझविणे – બુઝાવવુ, ઓલવવું (स. क्रि.)
विचार करणे – વિચારવું (अ. क्रि.)
विझणे – ઓલાવું, બુઝાવું (स. क्रि.)
विटाळणे – અભડાવું (स. क्रि.)
विणणे – વણવું (स. क्रि.)
वितळणे – ઓગળવું (अ. क्रि.)
विरघळणे – પીગળવું (अ. क्रि.)
विसरणे – વીસરવું, ભૂલી જવું (स. क्रि.)
विरजणे – અદરકવું (स. क्रि.)
विसळणे – વીછળવું (स. क्रि.)
वेचणे (कापूस) – ચૂંપવું (स. क्रि.)
वेचणे (धान्यकण) – વીણવું (स. क्रि.)
वेढणे – ઘેરવું (स. क्रि.)
वेधणे – તાકવું (स. क्रि.)
वैरणे (जात्यात घास) – ઓરવું (स. क्रि.)

श

शकणे – શકવું (अ. क्रि.)
शमणे – શમવું (अ. क्रि.)
शमविणे – શમાવવું (स. क्रि.)
शरमणे – શરમાવું (अ. क्रि.)
शिकणे – શીખવું, ભણવું (स. क्रि.)
शिकविणे – શીખવવું, ભણાવવું (स. क्रि.)
शिजणे – ચડવું, ઓસવાવું (अ. क्रि.)
शिजविणे – ચડાવવું (स. क्रि.)
शिरणे – પેસવું (अ. क्रि.)
शिवणे (कपडा) – સીવવું (स. क्रि.)
शिवणे (स्पर्शणे) – અડકવું (स. क्रि.)
शोभणे – શોભવું (अ. क्रि.)

शोभविणे – શોભાવવું (स. क्रि.)
शोधणे – ખોળવું (स. क्रि.)
शृंगारणे – શણગારવું (स. क्रि.)
शोषणे – ચૂસવું (स. क्रि.)

## स

सजविणे – સજવું (स. क्रि.)
सटकणे – છટકવું (अ. क्रि.)
सडणे – કોવાવું, સડવું (अ. क्रि.)
सडणे (धान्य) – ખાંડવું (स. क्रि.)
छडवुं (स. क्रि.)
समजणे – સમજવું (स. क्रि.)
समजावणे – સમજાવવું (स. क्रि.)
सरकविणे – સેરવવું (स. क्रि.)
सरणे / सटकणे – ખસવું, સરવું (अ. क्रि.)
सांगणे – કહેવું (स. क्रि.)
साचविणे – સંચવું (स. क्रि.)
सांडणे – ઢોળવું (स. क्रि.)
साजणे – છાજવું (स. क्रि.)
साठविणे – સંઘરવું (स. क्रि.)
साधणे – સાધવું (स. क्रि.)
सांभाळणे – સંભાળવું, સાચવવું (स. क्रि.)
सारवणे – લીપવું (स. क्रि.)
सुकणे – સુકાવું (अ. क्रि.)
सुकविणे – સુકાવવું (स. क्रि.)
सुजणे – સૂજવું (अ. क्रि.) / ફૂલવું
सुचणे – સૂઝવું (स. क्रि.)
सुचविणे – સૂચવવું (स. क्रि.)
सुटणे – છૂટવું (अ. क्रि.)
सुधारणे – સુધારવું (स. क्रि.)
सुरू करणे – શરૂ કરવું
सोडणे – છોડવું (स. क्रि.)
सोपविणे – સોંપવું (स. क्रि.)
सोलणे – છોલવું (स. क्रि.)
स्वीकारणे – સ્વીકારવું (स. क्रि.)
सहन करणे – સહેવું (स. क्रि.)

## ह

हरवणे – ગુમાવવું (स. क्रि.)
हाकारणे – હંકારવું (स. क्रि.)
हाकणे – હાંકવું, ચલાવવું (स. क्रि.)
हारणे – હારવું (अ. क्रि.)
हारविणे – હરાવવું (स. क्रि.)
हालविणे – હલાવવું (स. क्रि.)
हासणे – હસવું (अ. क्रि.)
हिंडणे – રખડવું (अ. क्रि.)
हिसकणे – છીનવું (स. क्रि.)
होणे – થવું (अ. क्रि.)

## अभ्यास

आता आपल्याला काही नामे व काही क्रियाशब्द समजले. त्यावरून पुढील अभ्यास आपल्याला करता येईल :

खालील वाक्यांचे गुजरातीत भाषांतर करा :—

[अ] (१) घोडे दौडतात. (२) फूल कोमेजते. (३) घर कोसळते. (४) मुले झोपतात. (५) विद्यार्थी जागतात. (६) साप चावतो. (७) मेंढ्या चरतात. (८) कागद चिकटतो. (९) शाई वाळते. (१०) पाय सुजतो. (११) नाक वाहते. (१२) डोके

दुखते. (१३) माणसे जेवतात. (१४) केस उडतात. (१५) प्राणी जगतात. (१६) धान्य पिकते. (१७) वानर उड्या मारतात. (१८) पाणी उसळते. (१९) श्वासवे ओघळतात. (२०) बर्फ वितळते.

[५] (१) बोका उंदीर खातो. (२) नळाला पाणी येते. (३) बाजारात दुधी मिळतो. (४) कांद्याला वास येतो. (५) वाघ जंगलात राहतो. (६) टोपलीत भेंड्या आहेत. (७) पिशवीला भोके नाहीत. (८) शिक्षक मुलांना शिकवितो (९) मुले रोपट्यांना पाणी घालतात. (१०) आई उलथन्याने भाकरी उलथते. (११) बाया चरखे चालवितात. (१२) पक्षी चोचीने दाणे टिपतो. (१३) माणसे पावसात छत्री उघडतात. (१४) मजूर कुदळीने जमीन खोदतो. (१५) ढग जगाला पाणी देतात. (१६) मुली सुईदोऱ्याने कपडा शिवतात. (१७) शेतकरी मातीने खड्डे भरतात. (१८) पाकिटांत पैसे नाहीत. (१९) झाडाच्या खोडात साप राहतो. (२०) नावाडी वल्ह्यांनी नाव चालवितो.

*

# प्रकरण ९ : भूतकाळ, भविष्यकाळ

१. आतापर्यंत आपण क्रियापदांची साध्या वर्तमानकाळाची रूपे कशी बनतात ते पाहिले. वर्तमानकाळाचे सुद्धा (१) रीतिवर्तमान, (२) अपूर्णवर्तमान, (३) पूर्णवर्तमान असे निरनिराळे प्रकार बनतात. पण तूर्त इतक्या तपशिलात न जाता, प्रथम साधेच काळ आपण घेऊ. म्हणून वर्तमानकाळानंतर भूत व भविष्य काळांची क्रियापदांची रूपे कशी होतात ते आता आपल्याला पाहावयाचे आहे.

१ मराठी वाक्य :—मुलगा सकाळी उठला.
गुजराती :—**છોકરો સવારે ઊઠ્યો.**

२ मराठी :—मुलगी सकाळी उठली.
गुजराती :—**છોકરી સવારે ઊઠી.**

३ मराठी :—मूल सकाळी उठले.
गुजराती :—**છોકરું સવારે ઊઠ્યું.**

४ मराठी :—मुलगे सकाळी उठले.
गुजराती :—છોકરાઓ સવારે ઊઠ્યા.

५ मराठी :—मुली सकाळी उठल्या.
गुजराती :—છોકરીઓ સવારે ઊઠી.

६ मराठी :—मुले सकाळी उठली.
गुजराती :—છોકરાં સવારે ઊઠ્યાં.

'ઊઠવું' या गुजराती क्रियाशब्दाची लिंगांनुसार व वचनांनुसार वरील प्रमाणे सहा रूपे झाली. ही रूपे जर तपासून पाहिली तर असे आढळून येते की स्त्रीलिंगी 'ઊઠી' ही दोन्ही वचनांची रूपे सोडून पुल्लिंगी व नपुसकलिंगी दोन्ही वचनी रूपे, 'ઊઠ' या धातूला अंत्य 'अ'कार वर्ज्य करून 'य' प्रत्यय लावून आणि मग त्याचे पुल्लिंग-नपुंसकलिंगानुसार एकवचनात अनुक्रमे 'ओ'कारान्त व 'उं'कारान्त व बहुवचनांत 'आ'कारान्त व 'आं'कारान्त करून बनतात. स्त्रीलिंगी रूपे सुद्धा खरे म्हणजे 'यी' प्रत्यय लागूनच बनतात, पण बोलताना फक्त 'ई'कारच राहतो म्हणून तेथे 'ઊઠ્યી' असे रूप दिसत नाही.

तेव्हां नियम असा झाला की क्रियाशब्दाचा भूतकाळ करताना धातूला ' य ' प्रत्यय जोडून मग लिंग व वचन याप्रमाणे ठरलेल्या रीतीनी पुल्लिंगी, स्त्रीलिंगी, नपुंसकलिंगी व त्यांचीच बहुवचनी रूपे करावयाची.

खाली आणखी दोन धातू चालवून दाखवितो :

ચાલવું

| लिंग | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| पु. | માણસ ચાલ્યો. | માણસો ચાલ્યા. |
| स्त्री. | સ્ત્રી ચાલી. | સ્ત્રીઓ ચાલી. |
| न. | બચ્ચું ચાલ્યું. | બચ્ચાં ચાલ્યાં. |

વસવું

| | | |
|---|---|---|
| पु. | માણસ વસ્યો. | માણસો વસ્યા. |
| स्त्री. | સ્ત્રી વસી. | સ્ત્રીઓ વસી. |
| न. | બચ્ચું વસ્યું. | બચ્ચાં વસ્યાં. |

२. वरील तीन धातू अकर्मक आहेत. आता सकर्मक धातू घेऊन चालवू. सकर्मक धातूचे मराठीत भूतकाळी कसे रूप होते ?

उदाहरण—रमेशने पुस्तक वाचले. या वाक्यात ' रमेश ' हा कर्ता, ' पुस्तक ' हे कर्म व क्रियापदाचे रूप ' वाचले ' असे आहे. कर्त्याच्या जागी कोणतेही स्त्रीलिंगी, नपुंसकलिंगी नाम घाला तरी ' पुस्तक ' हे कर्म जोवर कायम आहे तोवर ' वाचले ' हेच क्रियापदाचे रूप कायम राहील. तेच कर्म बदलून, म्हणजे लिंग बदलून किंवा वचन बदलून, कशी रूपे होतात पाहा : उदा. ' कादंबरी ' हें स्त्रीलिंगी एकवचनी कर्म घेतले तर ' रमेशने कादंबरी वाचली ', आणि बहुवचनी—' रमेशने कादंबऱ्या वाचल्या ' अशी रूपे होतात. म्हणजे सकर्मक धातू असेल तर भूतकाळात क्रियापदाची रूपे कर्माच्या लिंग-वचना-प्रमाणे बदलतात.

यावरून भूतकाळाच्या बाबतीत खालील दोन नियम आपल्या आढळात आले :

(१) धातू अकर्मक असेल तर क्रियापदाचे रूप **कर्त्याच्या** लिंग-वचनानुसार बनते.

(२) धातु सकर्मक असेल तर **ते कर्माच्या** लिंग-वचनानुसार बदलते.

पहिल्या प्रकारच्या वाक्याच्या प्रयोगाला 'कर्तरी प्रयोग' म्हणतात, आणि दुसऱ्या प्रकारच्या प्रयोगाला 'कर्मणी प्रयोग' म्हणतात. कर्मणी प्रयोगात कर्ता तृतीया विभक्तीत असतो.

३. गुजरातीत हेच सर्व नियम बरोबर तसेच लागू होतात. 'રમેશે પુસ્તક વાંચ્યું' या वाक्यातील 'વાંચ્યું' हे क्रियापद सकर्मक असल्यामुळे 'પુસ્તક' या कर्माच्या लिंग-वचनानुसार त्याचे रूप होणार आणि कर्ता तृतीया विभक्तीत ('રમેશે') असणार. कर्त्याच्या जागी दुसऱ्या कोणत्याही लिंगी अथवा वचनी कर्ता आला तरी जोपर्यंत 'પુસ્તક' हे कर्म आहे तोवर 'વાંચ્યું' असेच क्रियापदाचे रूप राहील. म्हणून हा 'कर्मणी प्रयोग' आहे. 'પુસ્તક' या कर्माऐवजी 'કથા' हे स्त्रीलिंगी एकवचनी व 'કથાઓ' हे स्त्रीलिंगी बहुवचनी कर्म आले तर अनुक्रमे पुढीलप्रमाणे वाक्ये होतील :

'રમેશે કથા વાંચી.'
'રમેશે કથાઓ વાંચી.'

आणि पुल्लिंगी एकवचनी व पुल्लिंगी बहुवचनी कर्मे असतील तर पुढील-प्रमाणे वाक्ये बनतील :

'રમેશે ગ્રંથ વાંચ્યો.'
'રમેશે ગ્રંથો વાંચ્યા.'

आता 'રમેશ'च्या ऐवजी नपुंसकलिंगी बहुवचनी कर्ता, उदा० 'છોકરાં', हा असेल तर वाक्य पुढीलप्रमाणे बनेल :

कर्म नपु. एक.– 'છોકરાંએ પુસ્તક વાંચ્યું.'
कर्म नपु. ब. व.– 'છોકરાંએ પુસ્તકો વાંચ્યાં.'
कर्म स्त्री. एक.—'છોકરાંએ **કથા** વાંચી.'
" " बहु.—'છોકરાંએ **કથાઓ** વાંચી.'
" पु. एक.—'છોકરાંએ ગ્રંથ વાંચ્યો.'
" " बहु.—'છોકરાંએ ગ્રંથો વાંચ્યા.'

या सर्व उदाहरणांवरून कर्मणी प्रयोगात कर्ता तृतीया विभक्तीत असतो आणि क्रियापदाचे रूप भूतकाळात कर्माप्रमाणे बदलते हे आपल्याला निश्चितपणे समजले.

अपवाद :—वरील नियमाला 'લાવવું', 'ભણવું', 'શીખવું', 'પામવું', 'ઊચરવું', 'વરવું', 'પરણવું', 'બોલવું', 'જમવું', 'લાગવું', 'કમાવું' असे काही क्रियाशब्द सकर्मक असूनही अपवाद आहेत. त्यांची भूतकाळची रूपे एक उदाहरण 'લાવવું'चे घेऊन करून दाखवितो :

લાવવું = आणणे

कर्म स्त्री. एक.<br>कर्ता पु. एक. } છોકરો ચોપડી લાવ્યો.

कर्म पु. एक.<br>कर्ता स्त्री. एक. } છોકરી ગોળ લાવી.

(पुढे 'सर्वनामविचारा'त हा धातू पूर्ण चालविला आहे तो पाहावा.)

४. काही क्रियाशब्द असे आहेत की त्यांची रूपे वर दिलेल्या सामान्य नियमाप्रमाणे न होता वेगळी—ठराविकच होतात. ते शब्द खाली चालवून दाखविले आहेत :

હોવું (अ. क्रि.)

| | एक. | बहु. |
|---|---|---|
| पु. | હતો | હતા |
| स्त्री. | હતી | હતી, હતાં |
| न. | હતું | હતાં |

થવું (अ. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | થયો | થયાં |
| स्त्री. | થયી | થયી, થયાં |
| न. | થયું | થયાં |

જવું (अ. क्रि.)

| लिंग | एकवचन | बहुवचन |
|---|---|---|
| पु. | ગયો | ગયા |
| स्त्री. | ગયી | ગયી, ગયાં |
| न. | ગયું | ગયાં |

બેસવું (अ. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | બેઠો | બેઠા |
| स्त्री. | બેઠી | બેઠી, બેઠાં |
| न. | બેઠું | બેઠાં |

ખાવું (स. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | ખાધો | ખાધા |
| स्त्री. | ખાધી | ખાધી |
| न. | ખાધું | ખાધાં |

લેવું (स. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | લીધો | લીધા |
| स्त्री. | લીધી | લીધી |
| न. | લીધું | લીધાં |

દેવું (स. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | દીધો | દીધા |
| स्त्री. | દીધી | દીધી |
| न. | દીધું | દીધાં |

પીવું (स. क्रि.)

| | | |
|---|---|---|
| पु. | પીધો | પીધા |
| स्त्री. | પીધી | પીધી |
| न. | પીધું | પીધાં |

भूतकाळाचे सुद्धा (१) रीतीभूत, (२) अपूर्णभूत, (३) पूर्णभूत असे प्रकार आहेत. ते कसे बनतात ते आपण पुढे पाहू.

आता क्रियापदाची भविष्यकाळाची रूपे कशी बनतात ते पाहू या :

## भविष्यकाळ

५. क्रियापदाच्या धातूला एकवचनांत व बहुवचनांत 'શે' प्रत्यय लावला की क्रियापदाचा भविष्यकाळ बनतो;

उदा० બેસવું—'બેસશે'; કરવું—કરશે ઇ.
कर्ता ए. व.—છોકરો પુસ્તક વાંચશે.
कर्ता ब. व.—છોકરાઓ પુસ્તકો વાંચશે.

लिंग कोणतेही असले तरी या रूपांत फरक पडत नाही.

मात्र पुरुषवाचक (मी, आम्ही वगैरे) सर्वनामें कर्त्याच्या स्थानी असताना या रूपात फरक पडतो, तो आपण सर्वनामांच्या प्रकरणात पुढे पाहू.

## अभ्यास

१. खाली दिलेल्या मराठी वाक्यांचे गुजराती भाषांतर करा :

(१) काकांनी पुतण्यास बोलावले; (२) मामाने भाचीस पेन दिले; (३) मुलांनी कचरा खड्ड्यात पुरला; (४) अशोकने हात रुमालाला पुसले; (५) गुरुजींनी मुलांना गोष्टी सांगितल्या; (६) गाईने गवत खाल्ले; (७) आंबे पिकले; (८) विद्यार्थी शेतात बसले; (९) आईने फळे आणली; (१०) संध्याकाळ झाली; (११) सकाळ होईल; (१२) बैल शेतात कामे करतील; (१३) पतंग आभाळात उडेल; (१४) वडील मुलांना पुस्तके आणतील; (१५) सभेत लोक येतील, वक्ते बोलतील; (१६) मंदिरात देवाचे दर्शन होईल; ('दर्शन' हा शब्द अशा ठिकाणी बहुवचनांत वापरतात) (१७) रमणभाईंच्या बगीचात डाळिंब, आंबा, पेरूची झाडे होतील; (१८) पोलीस चोरांना पकडतील; (१९) शेतकरी धान्य विकवतील; (२०) एक राजा होता.

२. पुढे दिलेल्या गुजराती वाक्यांचे (शेवटी दिलेल्या शब्दकोशाचे साहाय्य घेऊन) मराठी भाषांतर करा :

(૧) હરીભાઈનો દીકરો મિત્રોને મળ્યો; (૨) વિષ્ણુશર્માએ અર્થશાસ્ત્રનો ગ્રંથ લખ્યો; (૩) રબારીએ ઢોરોને છોડ્યું; (૪) ભાભીએ કઢી કરી ને પીરસી; (૫) ખેડૂતોએ ખેતમાં નાંગર નાંખ્યો; (૬) છોકરાએ કપડું ધોયું; (૭) છોકરાઓ નિશાળે ગયા; (૮) વાર્તા સર્વત્ર ફેલાયી; (૯) માશીએ ભાણેજીને શણગારી; (૧૦) આજીએ પૌત્રને આશીર્વાદ આપ્યા; (૧૧) વર ને વહુ સાંઝે ઘેર આવશે; (૧૨) લલિતાબા આજે કાકડીનું કચૂમર કરશે; (૧૩) રમેશ સવારે ચા લેશે; (૧૪) છાપામાં ખબર આવશે; (૧૫) આગગાડીમાં આજે સાંઝે લોકો અહીં પહોંચશે.

[ टीप : (ને = आणि, व; ઘેર = घरी; આજે = आज; અહીં = येथे.]

*

# प्रकरण १० : कृदन्त अथवा धातुसाधित शब्द

१. क्रियापदाचा विचार आपण करीत आहो तर क्रियापदावरूनच बनणारे जे काही शब्द आपण नित्य वापरतो व ज्यांच्यावाचून आपले चालत नाही त्या शब्दांची माहिती येथेच आपण करून घेतलेली बरी. धातूला, त्यापासून अमुक अर्थ साधण्याकरिता, काही प्रत्यय लावून जी रूपे बनतात त्यांना 'धातुसाधित' किंवा 'कृदन्त' म्हणतात. एक 'कर' धातू घेतला तर त्याची 'करणे', 'करीत', 'करून' 'करकरून', 'करताना', 'करता', 'केलेले', 'करणारा–री–रे' इतकी रूपे सापडतात. यांपैकी 'करणे' हे धातुसाधित नामच म्हटले जाते व त्याला नामाप्रमाणे विभक्त्यांचे प्रत्यय लागतात; उदा० "त्याच्या **करण्याने** सारा घोटाळा झाला." 'केलेले' हे विशेषणासारखे धातुसाधित आहे, ते 'करणे' या मूळ क्रियाशब्दाचे पूर्ण भूतकाळचे रूप आहे, आणि विशेषण म्हटल्यानंतर पुष्कळ वेळा आपण विशेषणाचा नामाप्रमाणे वापर करतो तसा या पूर्णभूतकाळी क्रियाशब्दाचाही वापर केला जातो. 'करणारा–री–रे' ही रूपे 'करणे' या क्रियाशब्दाच्या भविष्यकाळच्या रूपावरून बनलेली विशेषणेच आहेत— 'करणारा पुरुष, करणारी स्त्री, करणारे मूल' इ.

अशा रीतीने ही कृदन्ते क्रियाशब्दाच्या मूळरूपापासून बनलेली असल्यामुळे ते क्रियाशब्द सकर्मक–अकर्मक असतील त्याप्रमाणे त्यांची कर्मे त्यांच्यासोबत असू किंवा नसू शकतात. उदा०, 'त्याच्या काम करण्याने सारा घोटाळा झाला', 'तुमच्या जाण्याने काम साधले' वगैरे.

२. हेच सर्व बनाव गुजराती भाषेतही होतात. हाच 'કર' धातु घेऊन पाहायचे तर 'કરી', 'કરીને', 'કરીકરીને', 'કરતો–તી–તું' 'કરવું', 'કર્યું', 'કરેલું', 'કરનાર–રી–રું', 'કરતાં' अशी अनुक्रमें त्याची कृदन्त रूपे बनतात. या प्रत्येकाचे एक एक उदाहरण पुढे देतो :

(१) 'મહેતાએ કામ **કરી** જોયું.' (महेताने काम करून पाहिले.)

(२) 'મહેતો કામ **કરીને** આવ્યો.' (महेता काम करून आला.)

(३) 'મહેતો કામ **કરીકરીને** થાક્યો.'
(महेता काम करकरून थकला.)

(४) 'મહેતો કામ **કરતો** પકડાયો.'
(महेता काम करताना पकडला गेला.)

(५) 'મહેતાનું કામ **કરવું** શેઠને પસંદ નથી.'
(महेताचे काम करणे मालकाला पसंत नाही.)

(६) 'મહેતાનું **કર્યું** શેઠને પસંદ છે.'
(महेताने केलेले मालकाला पसंत आहे)

(७) 'છેવટે કામ **કરનાર** તો મહેતા જ છે.'
(शेवटी काम करणारा तर महेताच.)

(८) '**કરેલું** કામ એળે ગયું.' (केलेले काम फुक्ट गेले.)

इतर धातूंची आणखी काही उदाहरणे :

(९) પંખી **ઊડતું** ગયું. (पक्षी उडत गेला.)

(१०) મહેમાન **જમવા** (म्हणजे જમવાને માટે) આવ્યા.
(पाहुणे जेवण्याला–जेवायला आले.)

(११) નળ-દમયંતી પ્રીતીના પાશથી **બંધાયેલાં** હતાં.
(नळ-दमयंती प्रेमपाशाने बांधलेली होती.)

(१२) દુશ્મનની ચિંતા **વહોરવાનું** દેશને કારણ નથી.
(शत्रूची चिंता आपल्यावर घेण्याचे देशाला कारण नाही.)

(१३) ભક્તને **રક્ષનાર** ભગવાન સમર્થ છે.
(भक्ताला रक्षणारा भगवान समर्थ आहे.)

(१४) કુમુદ બગીચામાં **આવવાની** છે.
(कुमुद बागेत यावयाची आहे.)

(१५) અમરચંદને દોડતાં દોડતાં ઠોકર લાગી.
(अमरचंदाला पळता पळता ठेच लागली.)

३. पुढे संयुक्त किंवा जोड क्रियापदांच्या प्रकरणात कृदन्तांचा वापर कसा अपरिहार्य आहे ते दिसून येईल; उदा०, 'अरविंद हिंदी **वाचू** शकतो' અરવિંદ હિંદી **વાંચી** શકે છે), 'कोकिळा वसंतऋतूंत गातच राहते' (કોયલ વસંત ઋતુમાં **ગાયા** જ કરે છે) इ.

४. वरील उदाहरणांवरून कृदन्त किंवा धातुसाधिते ही नाम, विशेषण आणि अव्यय अशा स्वरूपांत वापरली जातात हे आपण पाहिले. नामस्वरूपांत असतांना त्यांना विभक्त्यांचे सर्व प्रत्यय लागतात. वर १० मधील '**મહેમાન જમવા....**' हे उदाहरण त्याचे द्योतक आहे. '**જમવું**' या मूळ क्रियाशब्दाला चतुर्थीचा '**ને**' किंवा '**ને માટે**' हा प्रत्यय तेथे लागला आहे. अर्थात गुजरातीत तो अध्याहृतही राहू शकतो. म्हणून '**જમવાને, -ને માટે**' ऐवजी फक्त '**જમવા**' एवढेही चालू शकते. दुसरें उदाहरण १२ ही पाहा— '**વહોરવાનું**' ('**વહોરવું**'चे षष्ठीचे एकवचन).

(१) '**મહેતો કામ કરતો**', '**પંખી ઊડતું**' या उदाहरणांतील '**કરતો**', '**ઊડતું**' ही वर्तमानकाळी कृदन्ते आहेत व ती विशेषणरूप आहेत. पहिल्या उदाहरणांत '**કરતો**' हे '**મહેતો**'चे आणि दुसऱ्यात '**ઊડતું**' हे '**પંખી**'चे विशेषण असल्यामुळेच विशेष्याच्या लिंग-वचनानुसार त्याचे लिंग-वचन बनले. ही वर्तमानकाळवाचक कृदन्ते; (२) '**મહેતાનું કર્યું કામ**', '**કરેલું કામ**' आणि '**નળ-દમયંતી બંધાયેલાં**' यांतील '**કર્યું**', '**કરેલું**' व '**બંધાયેલાં**' ही भूतकाळवाचक कृदन्ते आहेत व पुढच्या अनुक्रमे '**કામ**', '**કામ**' व '**નળ-દમયંતી**' (जोडपे) यांची ती विशेषणे आहेत हे सहज समजून येण्यासारखे आहे. (३) '**કામ કરનાર**', '**રક્ષનાર**' व '**આવવાની**' ही भविष्यकाळवाचक कृदन्ते आहेत व ती अनुक्रमे '**મહેતો**', '**ભગવાન**' व '**કુમુદ**' यांची विशेषणे आहेत. म्हणूनच त्यांची लिंगे विशेष्याप्रमाणे म्हणजे पुढच्या नामाप्रमाणे बनली आहेत.

अशा रीतीने वर्तमान, भूत व भविष्य तीन्ही काळवाचक कृदन्ते विशेषण म्हणून काम करीत असल्याचे आपल्याला आढळले.

आता (१), (२), (३) व (१५) या प्रयोगांतील '**કરી**', '**કરીને**', '**કરીકરીને**' व '**દોડતાં દોડતાં**' या कृदन्तांचा संबंध अनुक्रमे '**જોવું**', '**આવ્યો**', '**થાકયો**' व '**લાગી**' या क्रियापदांशी असल्यामुळे व त्यांच्या रूपांत बदल (म्हणजे व्यय) होत नसल्यामुळे ती क्रियाविशेषण अव्यये आहेत, हे उघडच आहे.

गुजरातीत ही कृदन्ते बनविण्याची रीत काय आहे ?

